


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या / नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ११. जानेवारी, सन १८८९. अंक १.

प्रकाशक ( एडिटर )

जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.

व

काशिनाथ नारायण साने, बी. ए.

हें मासिक पुस्तक

पुणें येथें

ज्ञानप्रकाश छापखान्यांत छापिलें.

किंमत ८ आणे.



अनुक्रमणिका

## वर्गणीदारांस विशेष सूचना.

वि० वि०. काव्येतिहास-संग्रहाचें आफिस पूर्वीचे ठिकाणांतून काढून हल्लीं सदाशिव पेंठ, पुणें, घर नंबर ७३६ रामभाऊ जोग यांचे वाड्यांत आणिलें आहे. कळावें हे विनंती.

काव्येतिहास-संग्रह व्यवस्थापक.

---

### पोंच.

सन १८८० ते १८८७ पैकीं.

| | रु० आ० | | रु० आ० |
|---|---|---|---|
| श्री० रा० पतंगशाहा विक्रमशाहा राजे साहेब जव्हार ... ... | ५–८ | रा० रा० से० ने० ज० ला० वसई | ४–६ |
| ,, ,, बापूसाहेब घाटगे ...... | ५–८ | ,, ,, ब० गो० वकील ... ... | ५–८ |
| ,, ,, भाऊसाहेब नातू ... ... | ४–० | ,, ,, रा० स० दांते ... ... | ४–६ |
| राव साहेब श्री० ग० जिनशीवाले. | ३५–० | ,, ,, भी० रं० जाळीहालकर. | ४–६ |
| रा० रा० आ० रा० आत्रे ... ... | १३–२ | ,, ,, कृ० र० आठवले...... | ८–१२ |
| ,, ,, गं० पां० गद्रे ...... ... | १३–२ | ,, ,, ना० न० फडणीस...... | १५–० |
| ,, ,, प० भि० भाटे ... ... | १३–२ | ,, ,, से० ने० ला० अक्कलकोट. | ५–८ |

सन १८८८ पैकीं.

| | | | |
|---|---|---|---|
| श्री० राजेसाहेब सं० जव्हार ...... | ४–६ | रा० रा० से० ने० ला० यावल ... | ४–६ |
| ,, रा० पंत सचीव साहेब... ... | ४–० | ,, ,, रा० स० दांते ... ... | ४–६ |
| ,, ,, बापूसाहेब घाटगे ...... | ४–६ | ,, ,, से० ने० ला० नांद्रे ... | ३–६ |
| रा० रा० ग० ना० खरे ... ... | ४–६ | ,, ,, से० ने० ला० अक्कलकोट. | ४–६ |
| ,, ,, गो० रा० केळकर... ... | ४–६ | | |

---

## विषयक्रम.

### बखरी.


मल्हार रामरावकृत राजनीति .. .. .. .. .. ७३–९०

मुखपत्र व अनुक्रमणिका .. .. .. .. .. .. १–६

वडगांवकर जयरामस्वामी व त्यांचे शिष्यप्रशिष्य ह्यांचे चरित्रांची बखर .. .. .. .. .. .. .. १–१६


### मराठी कविता.


अनेककविकृत भाग ४ थाः—

गजेन्द्रमोक्ष—वामनपंडितकृत वामनचरित्र—स्फुट श्लोक—नरहरिकृत गंगारत्नमाला .. .. .. .. .. .. १–८


---

करितात व विद्युल्लता व इंद्रधनुष्य पर्जन्यकाळीं पडावें तें उष्णकाळींच शत्रु देशाचेठायीं पडतें व रात्रीचे ठायीं इंद्रधनुष्य पडतें व वायु सुटण्याचे दिवस नसतां प्रचंड वायु सुटणें व दिवसाचें नक्षत्रदर्शन होणें व रात्रीचे ठायीं नक्षत्र दर्शन न होणें एतादृश निमित्तें म्हणजे दुश्चिन्हें ज्याचे देशांत होत असतील त्या शत्रूवर राजा येणें सांगितली प्रकारची सेना घेऊन जावें.

आतां राजा येणें शत्रु सैन्याचे ठायीं भेद करावा तो कसा म्हणाल तरि शत्रु याचे अमात्य व पुरोहित व युवराज यांचा भेद करावा. ते भेदले असतां राजा याचे दोन्ही बाहूच वश्य झाले. तेणें करून निःशक्त होतो. आतां कुलीन असा असेल त्याचा भेद करूं नये. काय निमित्त म्हणाल तरि आपणाकडे भेद पावलाही असतां त्याची ममता सोडणार नाहीं. यास्तव कुलीनाव्यतिरिक्त कोणास द्रव्य अनुग्रहास योग्य असेल त्याशींच भेद करावा. भेद करून शत्रुसैन्यापासून आले त्यांचा सन्मान करावा व आपलेही सेवकांचें समाधान करावें. याचें कारण काय म्हणाल तरि सांगतों. शत्रुसैन्यापासून आणिले त्याचा गौरव केल्यामुळें यांस असमाधान वाटेल. यास्तव आपले सेवक लोक यांचें समाधान करावें. शत्रु बळवान् याचा भेद केला असतां ऊनबळ होतो. यास दृष्टांत सांगतों. जसें काष्ट यास कीड लागली असतां तें काष्ट भंग पावतें. याजप्रकारें करून साम दाम दंड भेद या चतुर्विध प्रकारें शत्रु यासि जिंकून त्याचे पुरांत प्रवेश करावा.

आतां दूत-प्रेषण म्हणजे दूत पाठविणें ते कसे म्हणाल तरि सांगतों. आपण जाऊन राजकार्य अवश्यमेव करूनच येईन असा ज्यास अभिमान व प्रौढ व स्मरणवान् व बोलणार व सकलशास्त्र जाणणार व शूर व कार्याचेठायीं अति तत्पर असा असेल त्यासच योजून पाठवावा. आतां दूतांचीं लक्षणें तीन प्रकारचीं आहेत. तीं कशीं कशीं विचाराल तरि सांगतो. एक निसृष्टार्थ व मितार्थ व शासनवाहक असे तीन प्रकार. त्यांचीच विविक्षा सांगतों. निसृष्टार्थ म्हणजे देश, काल योग्य असें पाहून बोलणार. त्यास निसृष्टार्थ म्हणावें. यास दृष्टांत सांगतो. जसा पांडवांनीं श्रीकृष्णास पाठविलें होतें. यास निसृष्टार्थ म्हणावें. आतां मितार्थ सांगतों. जितकें सांगून पाठविलें तितकेंच जाऊन बोलणार त्यास मितार्थ

---

२६. भेद पावला असतां=फितूर झाला असतां.

२७. अनुग्रह कृपा.

२८. ऊनबळ=हीनबळ, शक्ति उणी झालेला.

२९. मनु म्हणतो:—
दूतं चैव प्रकुर्वीत सर्वशास्त्रविशारदम्
इंगिताकारचेष्टज्ञं शुचिं दक्षं कुलोद्गतम्
अनुरक्तःशुचिर्दक्षः स्मृतिमान् देशकालवित्
वपुष्मान् वीतभीर्वाग्मी दूतो राज्ञःप्रशस्यते
अ० ७-६३-६४.



अनुक्रमणिका

म्हणावें. आतां शासनहर सांगतों. इकडील पत्र त्यास नेऊन द्यावें, तिकडील उत्तर यास आणून द्यावें, यास शासनहर म्हणावें. याजप्रकारें तीन लक्षणें दूताचेठायीं आहेत म्हणोन सांगितलीं. आतां निसृष्टार्थ दूत यांणीं शत्रूकडे गेला असतां शत्रु नगराचेठायीं उगेच जाऊं नये. आधीं त्या राजियास सांगून पाठवावें. त्याची आज्ञा आणून नंतर त्याचे नगरांत प्रवेश करावा. नगरांत गेल्यावरि राजसभेतही जाणें तेसमयीं राजियास सांगून पाठवून त्याचें उत्तर आणून मग राजसभेंत जावें. सभेंत गेल्यावरि राजा यास अभिवंदन करून उभेंच रहावें. बसों नये. राजा येणें बसा म्हटलें तर बसावें. शत्रुराज्याचा सर्व शोध करावा व दुर्गांचाही शोध घ्यावा. व दुर्गांत रक्षकादि कसे आहेत व तेथें यंत्रें आदिकरून साहित्य कसें आहे याचाही शोध घ्यावा. राजा कोशसंपन्न कसा आहे व यास मित्र कोण कोण आहेत, कितीक आहेत, व सेना किती आहे, ती कशी आहे, हें पाहून व राजाचीं छिद्रें असतील तीं सकळ जाणून व प्रजेची राजा याचेठायीं अनुरक्तता कशी आहे किंवा उदास आहे, राजा याचे गुणवर्णन करिते किंवा नाहीं करीत, व फळेंकरून व द्रव्येंकरून व कर्मेंकरून राजास कशा भजतात याचा शोध घ्यावा. व सभेचेठायीं आपले स्वामीची आज्ञा तदनुरूप भय पैंवत नाहीं [ असें ] निःशंकपणें बोलावें. व आपले राजा याची व शत्रूकडे आला त्या राजाची चतुर्विधवृत्तें राजांत असावें तें पहिलें सांगितलें त्या चतुर्विध प्रकारेंकरून राजाची स्तुति करावी व आणखी तीर्थें व आश्रम वगैरे स्थानें यांचें वर्णन करून राजा यास संबोधन द्यावें. कीं, हा राजा व आपला राजा सकळ शास्त्रें जाणणार असे आहेत. हें बोलणें तें आणखी जन सभेंत बसले असतील त्यांशीं बोलत असावें व जनासि आपला राजा याचें ऐश्वर्य सांगावें. तें कसें म्हणाल तरि प्रताप व कुल व ऐश्वर्य म्हणजे संपत्ति व दानशूरता व मिष्टान्नें करून ब्राह्मणभोजनें घालणार असा थोर व परम दक्ष याजप्रकारें करून बोलवें. व दूत जो येणें राजा आपणासि अनिष्ट बोलला असतांही त्याचें सहनच करावें. आपणास कामक्रोधही नसावा आणि वेतसी वृक्ष म्हणजे नदीचेठायीं शेरणीचे वृक्ष उंच असे असतात, महापूरही आला तरि नम्रत्वें करून असतां कदापि भय पावत नाहींत, तसे प्रकारें करून दूत जो येणें नम्रत्वें असावें, व आपणासि बोलला असतां आपण त्यासि धिक्कारून बोलूं नये. त्याचा अंतर्भाव काढावा आपण आपला अंतर्भाव देऊं नये. व एकटेच निद्रा करावी व स्त्रियांचा संग करूं नये व मद्यपानही करूं नये. याचें कारण सांगतों.

---

३०. म्हणजे "भय न पावतां" असा अर्थ.

३१. चतुर्विधवृत्त–मागें सांगितलें आहे.

आपला अं-र्गीव निद्रेत स्वप्नांत बोलत उठल्या अन्यास कळेल, यास्तव एकटेंच निजावें. व स्त्रियांशीं संग केला असतां कामासक्त होऊन त्यांशीं कोणेसमयीं काय बोलणें पडेल न कळे व मद्यपानें करून अव्यवस्थपणेंही काय बोलणें घडेल न कळे, म्हणोन तिन्हीं सांगितलीं कर्में करूं नयेत. सकळ राज्याचा शोध घ्यावा व अरण्यें असतील त्यांचाही शोध घ्यावा व राजा याचे आसमंताद्भागीं कोण कोण राजे आहेत, ते या राजियास अनुकूळ कोण प्रतिकूळ कोण आहेत व युद्धास भूमि चांगली कोणती यांचा शोध करणें हीं दूतांचीं कर्में होत. दूत म्हणजे राजा याचे नेत्र होत[३२]. यास्तव दूतद्वारा राजा येणें सकळ जाणत असावें. तें कसें म्हणाल तरि परराज्यांतील दूत आला त्याचें चेष्टित पाहत असावें व परराज्यांतील वृत्तांत पाहत असावा[३३]. हीं निसृष्टार्थ दूत सांगितला त्याचीं लक्षणें व कर्में होत. याजप्रमाणें दूतलक्षणें सांगितलीं.

आतां चार लक्षणें सांगतों. चार म्हणजे काय म्हणाल तरि गुप्त सेवक. गुप्तपणें परराज्यांतील शोध घेऊन येऊन सांगणार त्यास चार असें म्हणावें. त्याचीं लक्षणें सांगतों. तपस्वी याचें रूप धारण करणार असे, धूर्त, व उदम्याचेच वेश धारण करणार, असे प्रकारचे वेश आपले पालटून, अन्य धरून, परराज्यांत जाऊन, सकळ जनाचें मनोगत घेऊन येणार असे प्रकारचें सदैव वर्तमान घेऊन येऊन राजियास श्रुत करून पुन्हा जावें. या रीति सूक्ष्म वर्तमानादिक चारद्वारा विविध प्रकारें करून जनाचें चेष्टित पाहत होत्साता राजा येणें स्वस्थ निद्रा करावी. येविशीं दृष्टांतद्वय करून सांगतों. जसा सूर्य आपले किरणें करून सर्वांस व्याप्त होतो व वायु भ्रमणरूपें करून सकळांस व्यापून आहे तेणें प्रकारें करून चारद्वारा सकळ जगाचेठायीं व्याप्त असावें. चार जे ते एकास एक परस्परें आपण राजचार असे नेंकळत[३४] होत्साते बहुत चार असावे. याजप्रमाणें प्रकटपणें पाठवणें त्यास दूत असें म्हणावें. आणि गुप्तरूपें पाठवणें त्यास चार असें म्हणावें. याजप्रमाणें दूतप्रेषण लक्षणें सांगितलीं. आतां दोन प्रकारचे दूत सांगितले त्यांणीं जड म्हणजे वेडे व मुके असतील त्यांशीं व बधिर व

---

३२. 'चारैःपश्यंति राजानः'

३३. भीष्म म्हणतातः—

चारांश्च वियात् प्रहितान् परेण भरतर्षभ
आपणेषु विहारेषु समाजेषुच भिक्षुषु
आरामेषु तथोद्याने पण्डितानां समागमे
देशेषु चत्वरेचैव सभास्वावसथेषुच
एवं विचिनुयाद्राजा परचारं विचक्षणः
चारे हि विदिते पूर्वे हितं भवतिपांडव
शां० ६९-८-१२.

३४. चार कसे असावे व त्यांचा संचार कोठ कोठें असावा तें भीष्म सांगतातः—

प्रणिधींश्च ततःकुर्योज्जडांधबधिराकृतीन्
पुंसःपरीक्षितान् प्राज्ञान् क्षुत्पिपासाश्रमक्षमान्
अमात्येषु च सर्वेषु मित्रेषु विविधेषु च
पुत्रेषु च महाराज प्रणिदध्याःसमाहितः
पुरे जनपदे चैव तथासामन्तराजसु

३५.

यथा न विद्युरन्योन्यं प्रणिधेयास्तथा हि ते



अनुक्रमणिका

म्हणून सांगितलें तेणें चालून सर्व सेना पुढें घालून व जीं जीं थकलीं त्या सर्वांस आश्वासन देऊन सांभाळून घेऊन येत असावें. याप्रमाणें सेनापतीचीं लक्षणें व व्यूहांचे प्रकार विस्तारें करून सांगितले.

याजउपरि कपटयुद्ध करून शत्रूस जिंकावा कसा तोच सांगतो. शत्रु बहुत दुरून येऊन श्रांत झाला आहे असा पाहून त्यासमयीं अथवा क्षुधेंकरून व तृषेंकरून पीडित जहाला व व्याधीकरून व महर्गता सैन्यांत पडून व महामारीच्या उपद्रवेंकरून सैन्यांत बहुत पीडा प्राप्त झाली आहे असे प्रकारचा व चोरांनीं श्रमी केला असा व अग्नी [ करून, ] पांसु म्हणजे धूळीकरून व मोठे मोठे पाट पाण्याचे यांत पडला आहे असे समयांत व निद्रा केली आहे त्या संधींत, अथवा भोजनाचे अवसरीं व पर्वतादि अडचणींत, पुढें विषम देश असला तरि, या संधींत शत्रु गांठावा. व शस्त्रांस विषें लावावीं. तें शस्त्र शत्रूवर टाकावें. असे अनेक प्रकारें करून शत्रूस लोभ दाखवावा आणि असावध पाहून त्यासमयीं आपण सावधपणें असोन चालून जाऊन शत्रूस जिंकावा. व रात्रीचेठायीं शत्रूस निद्रा लागूं न द्यावी. म्हणजे दिवसाचेठायीं स्वस्थ निद्रा करितो. समयसंधि पाहून गांठावा. अथवा शत्रूस विश्वास दाखवावा तेणेंकरून तो रात्रीचे भागीं स्वस्थ निद्रा करितेतो. त्या अवसरीं सौप्तिकविधानें करून मारावा. सौप्तिक विधान काय म्हणाल तरि तेंच सांगतो. द्रोणाचार्य याचा पुत्र अश्वत्थामा याणें पांडवांचे पुत्रादिकांस निद्राभागींच मारलें, त्याप्रमाणें शत्रुवध करावा. व त्यांत ब्राह्मणांस मारूं नयेत. ब्राह्मणांस निद्राकालीं व अन्यकाळीं कदापि न मारावें. जर ब्राह्मण होत्साता शस्त्र धरून चालून आला तरि त्यास मारावा. त्याचा दोष नाहीं. आधीं त्यास वर्ज करावा. तेंही न ऐकून चालूनच आला तरि त्यास आततायी म्हणावें. तेव्हां त्याचा वध करावा. हें न करितां त्याचा न वध केला आणि त्याणेंच येऊन आपणावरि शस्त्रघात केला येणेंकरून आपला मृत्यु जाहला यास आपणास आत्महत्येचें पातक घडतें. यास्तव वेद-आज्ञा आहे कीं, आपणांस मारावयास आला असा ब्राह्मण थोर असा व आचारशील व वेदविद्यादिपारंगत जाणणार असा होत्साता युद्धास शस्त्र घेऊन मारावयास आला त्यास मारावा, त्याचे मारणें करून आत्महत्यासंरक्षण केलें असतां अश्वमेधाचें पुण्यफळ येतें. आपणाव्यतिरिक्त दुसरियाचे वधास ब्राह्मण जात असतां आपण त्याचा वध करूं नये. याजप्रमाणें संधि पाहून शत्रूस गांठून वध करावा म्हणून सांगितलें. यांत आपलें

१८. परिश्रांते विदीर्णे वा भुंजाने वापि शत्रुभिः। प्रस्थाने वा प्रवेशेवा प्रहर्तव्यं रिपोर्बलम्
निद्रार्त्तमर्धरात्रे च तथा नष्टप्रणायकम्। भिन्नयोधं बलं यच्च द्विधा युक्तं च यद्भवेत्
इत्येतं निश्चयं चक्रे सुप्तानां निशिमारणे॥ सौप्तिकपर्व १-५१-५५.

सैन्य याचें फार विचक्षणपूर्वक संरक्षण करून शत्रूस संधींत गांठावा. आपणांस देशकाल सैन्यादि अनुकूल आहेत तरि शत्रु जो यास प्रकटच युद्धच करावें. हे गुण अनुकूळ नसल्या सांगितल्याप्रमाणें संधि लक्षून शत्रु जिंकावा. व शत्रूच्या प्रजा आहेत त्या जो कालपर्यंत आपल्या जाहल्या नाहींत तोंवरि त्यांस लुटाव्या, माराव्या, त्यांचा अनेक प्रकारें करून नाश करावा. आपल्या असें जाहल्यावरि त्यांचें पालन पुत्रवत् करावें. याजप्रमाणें कपटयुद्ध करावें. म्हणून सांगितलें त्याची विविक्षा करून सांगितलें.

याजवरि आतां धर्मयुद्ध करावें तें कसें करावें म्हणून म्हणाल यास्तव तेंच सांगतों. उत्तम अथवा मध्यम व कनिष्ठ या तिन्हीं प्रकारांतून कसाही शत्रु असो त्याणें होऊन युद्धास पाचारिलें त्याजवरि युद्धास अगत्य जावें. याचें कारण सांगतों. जर त्याशीं युद्धास न गेलें तरि तो आपले प्रजेस पीडा देईल. पीडा प्रजेस केली असतां आपणांस दोष प्रजारक्षण न केलें होय तो व क्षात्रधर्माचाही नाश होतो. यास्तव युद्धास बोलाविलें असतां त्याजवरि जावें. मग युद्धाचेठायीं विन्मुख न होतां मरणही पावला असतां स्वर्गांप्रति जातो. अथवा जयच पावला असतां इहलोकींचें राज्य पावतो.

आतां राजा जो येणें युद्धसमयीं आपले शूर आहेत त्यांची स्तुति करावी ती कशी करावी म्हणाल तरि सांगतों. तुमचें कुल विस्तार बंधुबल आहे बहुत आणि तुमचें शौर्य कसें आहे जें सर्व जन वर्णितात व तुह्मीं परशु व धनुष्य व शक्ति व चक्रादि आयुधें करून युद्ध करण्यास परम निपुण व माझेठायीं तुमचा परम स्नेह, असे तुह्मीं गजारूढ अश्वारूढ होऊन शत्रूवर युद्धास गेले असतां माझा जय कसा न होय ! निश्चयें करून होईलच ! युद्धाचेठायीं मरण पावला असतां स्वर्गलोक पावतो. स्वर्गप्राप्तीचीं अनेक साधनें आहेत तींच सांगतों. ज्योतिःष्टोमादि यज्ञ करावे तेणेंकरून स्वर्गच प्राप्ति होते. परंतु यज्ञाचें ज्ञान पाहिजे. व प्रयासही त्यास बहुत पडतात. व पा हि जे त से च उपासनायोगेंही स्वर्गही प्राप्ति होती व आणखी तेणेंकरूनही प्राप्ति होते. तसेच योगाभ्यासेंही स्वर्गातें पावतो. परंतु वायूचा विरोध करावा लागतो व आहार व निद्रा व व्यायाम यांचाही निरोध करावा तेव्हां असे प्रकारचे साहसें करून घडतो. त्यांत कांहींएक व्यंग पडल्या असतां अधःपातासच जातो. यास्तव सकलही सांगितलीं साधनें याजपेक्षां युद्धकर्मरूप स्वर्गसाधन श्रेष्ठ होय. हें अधिक कसें म्हणाल तरि यास विशेष साधनें सायास कांहींच लागत नाहींत. युद्धाचेठायीं पराङ्मुख न होतां युद्ध करावें म्हणजे परम पातकीही असतां तो स्वर्गांप्रति जातो. याजप्रमाणें क्षात्रधर्म तुम्ही

३१. यस्य शोणितवेगेन वेदिःस्यात्संपरिप्लुता । केशमांसास्थिसंपूर्णा स गच्छेत्परमां गतिम्.



अनुक्रमणिका

सकल जाणतच आहां. व येविशीं व्यास व मनु या उभयतांनीं युद्धाविषयीं क्षत्रियांस मोठा लाभ वर्णिला आहे तो कोणता म्हणाल तरि तोही सांगतों. स्वामिकार्याचे ठायीं युद्धांत व गाई ब्राह्मणांचेठायीं ज्यांणीं जीव दिला त्यास स्वर्गाचेठायीं वास प्राप्त होतो व या लोकाचेठायीं विपुलयशप्राप्ति होते. तपश्चर्येस बहुत काळ व बहुत श्रम लागतात. व यज्ञाचेठायीं पशु मारून यज्ञ सांग करावा तेणेंकरून फलप्राप्ति होते. ते युद्ध हाच यज्ञ होय यांत आपला देह म्हणजे पशु हाच होमवाह केला असतां निमिषमात्रें करूनच सहज स्वर्गप्राप्ति होती. वास्तव हें शरीर नाशिवंत हा निश्चयच होय. मरण काळ प्राप्त झाला असतां कोणताही उपाय केला तरि देह प्राण टाकून जाणारच. गृहाचेठायींही युद्धास कोणतेही काळीं न जातां राहिला असतां मरणकाळीं मरण अवश्यमेव प्राप्त होईल. परंतु गृहाचेठायीं आसमंताद्भागीं स्त्री पुत्र सुहृद् इत्यादि रुदन अट्टाहास्य करून करीत होत्साता त्या योगें करून क्लेश पावून ईश्वरस्मरण याची विस्मृति होऊन व अंगास मूत्र व विष्टा लागली आहे ऐसे प्रकारें करून नानाव्याधि रोगें अति पीडा पावला असतां प्राणोत्क्रमण पावतो, तेणेंकरून अधोगतीतें जातो. हें बरें किंवा युद्धाचेठायीं भृकुटी वक्र करून मुख शत्रूवर परम भय [ कर ] आवेशें करून कांहीं एक पीडा न पावतांच मरण पावून मोक्षस्वर्गास प्राप्त व्हावें हें बरें ? याचा विचार करावा. जो प्राणी युद्धाचेठायीं धारातीर्थीं मरण पाऊन कीर्तीस पात्र न जहाला, व जो अध्ययनें करून व द्रव्यें करून व तपें करून व पुण्यें करून व दानें करून व कोणतेही गुणें करून पृथ्वीचेठायीं थोराचे मुखें स्तवन न पावला असतां मरण पावला, तरि त्या प्राणियाचें जन्म मरण मुंग्या कीटक यां समान होय. धारातीर्थीं मरण पावला असतां त्यास स्वर्गीं अप्सरादि स्त्रिया वश्य होऊन सुख पावतो. हेंही असो. परंतु युद्धाचेठायीं जो प्राणी पलायन करून गृहीं आला त्याच्या स्त्रिया सुहृद्जना देखतां त्याचे मुखाकडे पहावयास लज्जा पावतात. मग स्वर्गांगना समजलेंच आहे ! शूर जे आहेत त्यांणीं आपणाही पेक्षां शत्रु बहुत बलवान् असाही असतां त्याजवरि जाऊन युद्ध करावेंच. कदापि पलायन न करावें. येविशीं दृष्टांत सांगतों. गज स्थूल बहुत असतांही सिंह आपलाही देह त्याजपेक्षां लहान हा विचार न करितां जाऊन गजाचें गंडस्थळ विदारण करून गंडस्थळाचे ठायीं मुक्ताफळें आहेत तीं मुखांत येतात तीं टाकून रुधिर प्राशन

५०. युद्धयज्ञांत ऋत्विज् कोण, हवि कोणते, दक्षणा काय, व याचें फल काय इत्यादिकांचें वर्णन शांतिपर्वी ९८ अध्यायांत केलें आहे.

५१. यस्तु योधः परावृत्तःसंत्रस्तो हन्यते परैः। अप्रतिष्ठं स नरकं याति नास्त्यत्र संशयः शांतिपर्व ९८.

करितो. तसें शूरांनीं युद्ध प्राप्त झालें असतां विचार व पलायन न करितां युद्ध-च करावें. युद्ध हाच कोणीएक यज्ञ होय. याचेठायीं शूर जे आहेत त्यांणीं स्वामिकार्याचेठायीं सेनासन्मुख जाऊन भय न पावतां व मार्गे न परततां, संग्रामाचेठायीं आपणांस कोणी साह्य असावें नंतर युद्ध करावें ऐशी हीं बुद्धि न धरितां, युद्ध करितात त्यांस इंद्रासारखे लोक प्राप्त होऊन सुख पावतात. संग्रामाचेठायीं त्रिशूलादिक आयुधें करून जे शूर मरण पावतात त्यांजविषयीं शोक कदापि न करावा. कां म्हणाल तरि युद्धांत मरण पावला असतां उत्तम गतीतें पावून स्वर्गीचे ठायीं नानाप्रकारचे भोग भोगितात. युद्धाचेठायीं मरण पावला त्यास अन्न-उदकें क्रिया न केली व प्रायश्चित्त व स्नान न घातलें व क्रियादि कांहीं जहालीं नाहीं असेंही असतां स्वर्गीं अप्सरादि शतावधि एकमेकांशीं विवाद करितात कीं, मीच हा भ्रतार करीन. जो युद्धाचेठायीं पलायन न पावतां मरण पावला त्यास तप व पुण्य व सनातनधर्म व चारिही आश्रम यांचें श्रम त्यास घडलेंच जाणावें. त्रैलोक्याचेठायीं शौर्यावांचून उत्कृष्ट पदार्थ आणखी दुसरा कोणताही नाहीं. सर्वही उत्कृष्ट शूराचेच ठायीं प्रतिष्ठित म्हणजे राहिले आहेत. चर प्राणी जे आहेत त्यांचें अन्न अचर प्राणी आहेत ते होतात. ज्यास दंष्ट्रा म्हणजे दाढा नाहींत त्यांस दंष्ट्रायुक्त प्राणी असतात तेच त्यांस भक्षितात. ज्यांस हस्त नाहींत त्यांस हस्तयुक्त प्राणी आहेत ते त्यांचें भक्षण करितात. याचप्रकारेंकरून शूर जे यांचें अन्नस्थानीं भीतरूप प्राणी जे ते होतात. सर्व प्राणीमात्र समान हस्त पाद पृष्ठ उदर आदिकरून एकरूप अशींच सर्व मनुष्यें असतात. परंतु शूर जे यांचे पृष्ठिभागीं हात जोडून शरण अशूर जे प्राणी ते असतात. व युद्धाचेठायीं जे प्राणी सन्मुख मरण पावले त्यांस देवांगना विमानाचेठायीं घेऊन आपले कुचालिंगन हस्तद्वय हाच पिंजरा करून त्यास अत्यंत आनंदें करून रमवितात. शूर जो तो युद्धाचेठायीं गेला असतां एक भागाचे

---

५२. योधप्रोत्साहन कसें करावें तें सांगतातः—अभीरूणामिमे लोका भास्वंतो हंत पश्यत। पूर्णा गंधर्वकन्याभिः सर्वकामदुहोऽक्षयाः। इमे पलायमानानां नरकाः प्रत्युपस्थिताः॥ अकीर्तिः शाश्वती चैव यतितव्यमनंतरम्। तान्दृष्ट्वारीन्विजयते भूत्वा संत्यागबुद्धयः। नरकस्याप्रतिष्ठस्य माभूत वशवर्तिनः। त्यागमूलं हि शूराणां स्वर्गद्वारमनुत्तमम्॥
शां० अ० ९९.

५३. वराप्सरःसहस्राणि शूरमायोधने हतम्। त्वरमाणा भिधावंति मम भर्ता भवेदिति
शांतिपर्व अ० ९८.

५४. शूरप्रशंसा शांतिपर्वी ९९ अध्यायाच्या शेवटीं पहावी.
न हि शौर्यात्परं किंचित् त्रिषु लोकेषु विद्यते। शूरः सर्वं पालयति सर्वं शूरे प्रतिष्ठितम्
अ० ९९-१८.

ठायीं देवांगना वाट पाहत असतात, कीं आह्मी यास वरूं; एक भागीं लक्ष्मी उभी असते कीं, हा जय पावला असतां यासि आपण वरीन म्हणते. व अपकीर्ति जे ते सर्व कुलास कलंककारक ते कोटी जन्मांचीं पातकें घेऊन पळून जाते. पितरही आनंदातें पावून हर्षायमान होत्साते आम्हांस यांणीं तारिलें असें ह्मणतात. स्वामिकार्याचेठायीं प्राणाचीही गणना करीत नाहींत, येविशीं शूरास काय आश्चर्य आहे ! अविवेकें करून सर्व शत्रु व मित्रादि पाहत असतां प्राणभयें करून पलायन करणें हेंच महान् परम आश्चर्यकारक होय ! शूर यास युद्धाचे ठायीं क्षतें झालीं ते अलंकार कांहीं एक त्याचे शरीरावर होतात असें नाहीं, सर्व कुलास भूषणकारक होतात. यासि दृष्टांत. जसे वृक्ष लावण्यास क्षतें करावीं त्याजप्रमाणेंच यशरूप वृक्ष वृद्धि करण्याचींच [ हीं क्षतें ] कारणें होत. संग्रामाचेठायीं यश पावला असतां सर्व संपत्ति वरतात. व मरण पावला असतां अश्वमेधादि यज्ञ करून जे लोक प्राप्त ते लोक याची मार्गप्रतीक्षा करितात. ब्राह्मण जे यांणीं व शास्त्रकर्ते यांणीं युद्धाचेठायीं शूर जो तो एक एक पद गमन करितो त्यास पदा पदाचेठायीं अश्वमेधाचें पुण्य घडतें असा नियम केला आहे. शूर जे आहेत ते युद्धाचे ठायींच मरण दुःख कसें मानून आ न वि ता त. जशी निद्रा केली तो प्राणी जागृत होऊन तत्काल व्यवहार करितो तसे प्रकारें करून मरण युद्धाचेठायीं शूर पावला तो तत्क्षणींच मंदाकिनी-विरल-कमल-सुगंध-मिश्रित वायु आंगावर येत आहे ऐसा होत्साता विमानाचे ठायीं बसोन भोंवत्या देवांगना-परिवेष्ठित आलिंगन करीत आहेत, ऐसें सुख तत्कालींच अनुभवितो. क्षत्रियास युद्धकरणें हेंच परम श्रेयस्कर व हाच धर्म होय. रणभूमीचे ठायीं शत्रूस जिंकलें असतां पृथ्वी भोगणें, मरण पावला असतां स्वर्गादि सुख पावणें, हा सिद्धांत होय. येविशीं श्रीकृष्णजीनीं अर्जुनास बोध केला आहे तोही सांगतों. युद्ध टाकून पळून* आला अशा प्रकारचा तो अजरामर वांचला असें कोठेंही ऐकिलें नाहींच. मान जो याचें अवलंबन करून कीटकादि पशु हे परस्परें युद्ध करतात. मग मनुष्यदेह प्राप्त झाला असतां मान टाकून युद्धत्याग करणें हें अत्यंत निंद्य होय. युद्धांत मरण पावणें येणेंकरून स्वर्गप्राप्ति होती. या सुखास जो पुरुष असेल तो तर हें युद्धरूप मरण कदापि टाकणार नाहींच. संग्राम सोडून गेलें म्हणजे मृत्यूपासोन वांचला असा निश्चय असल्यास संग्राम टाकावा. तें तरि घडणार नाहींच. मरणकाळ असेल ते दिवशीं मृत्यु नेईल यांत गुंता नाहीं. मग

५५. " हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् " भगवद्गीता—२.

* ' पळून ' व ' आला ' या दोन शब्दांच्या मध्यें एक ' न ' मूळांत आढळतो तो फाजील आहे असें संदर्भावरून होतें.

५६. गुंता=अडथळा, संशय.

अमृतासारिखे शुभ्र यश कां टाकावें ! युद्धापासोन पलायन केलें असतां दोष प्राप्त होतात. तेंही सांगतों. जीं राजा याचीं पातकें तीं त्यास भोगणें प्राप्त आणि त्याचें पुण्य सर्वही राजा यास जातें, आणि तो अधःपातास जातो. याजप्रमाणें राजा जो याणें आपले शूर यांस वारंवार उपदेश करीत असावा.

आतां धर्मयुद्धाचें प्रमाण सांगतों. धर्मयुद्धाचेठायीं गज जे यांजवरि गजसादी यांणींच जावें. व तुरंग-यानी यांणीं अश्वारूढ यांजवरिच जावें, रथी यांजवरि रथी यांणीं, पदाति यांजवरि पदाति, याजप्रमाणें यथायोग्य पाहून युद्ध करावें. यास धर्मयुद्ध म्हणावें. व आणखीही सांगतों. चतुरंग सेना असलिया जशास तसें योजावें. तें नसतां एक दोन अंगें करून सेना ज्याची असेल त्याशीं धर्मयुद्ध कसें करावें तेंही सांगतों. अश्वारूढ झाले आहेत त्यांजवरि तीन पदाति यांणीं जाऊन युद्ध करावें. गजावरि रूढ झाले यांजवरि पांच अश्वारूढ जे यांणीं जावें. हेंही धर्मयुद्धच होय.[५७] आतां अवध्य म्हणजे वधूं नयेत ते कोण कोण म्हणाल तरि तेच सांगतों. स्थलाचेठायीं उभा आहे, वाहनावरी बसला नाहीं, व नपुंसक व हात जोडून आला त्यास व ज्याचा केशपाश सुटला आहे व वहनावरून उतरून पृथ्वीवर बसला आहे व मी तुझा आहे असें प्रकारें म्हणणार त्यास व निद्रिस्तास व युद्धास सज्ज झाला नाहीं त्यास व नग्न झाला आहे व आयुध हातचें टाकिलें आहे त्यास व जो युद्धास उभा न राहिला व युद्ध अवलोकन करीत असेल त्यास व दुसऱ्याशीं युद्ध करित असतां त्यास, आपण न मारावें. व भय पावला असा त्यास व पलायन करून जाणार त्यास व आणखी वृद्ध तसेच बाल व स्त्री व ब्राह्मण व मुखाचेठायीं तृण धरून उभे राहणार व जे पाणी पीत असतील त्यांस, तसेंच भोजन करणारास व ज्यांणीं युद्ध-कवच आंगांत न घातलें त्यांस व हत्ती व अश्व, रथी व दूत यांस न मारावें. व राजा जो आहे त्यास राजाव्यतिरिक्त दुसरे शूर यांणीं न मारावें. याजप्रमाणें धर्मयुद्धांत अवध्य सांगितले. याजप्रमाणें कपट युद्धाचे ठायीं हेच अवध्य आहेत.

आतां राजा जो याणें पुढें युद्धाचा प्रसंग प्राप्त झाला असतां शूर जे यांचें स्तवन करून त्यांस जो जें मागेल तें द्रव्य अलंकार भूषणें वस्त्र व सुवर्ण आदिकरून देऊन संतोषी करावें. ज्याची योग्यता [जशी] तशी पाहून द्यावें. म्हणजे त्याचे जयास्तव कोणता शूर युद्ध करणार नाहीं ? सर्वही करतीलच आणि जयही

---

५७. शांतिपर्व अध्याय ९५ पहावा.

५८. विशीर्णकवचं चैव तवास्मीति च वादिनम् । कृतांजलिं न्यस्तशस्त्रं गृहीत्वा न विहिंसयेत्
वृद्धबालौ न हन्तव्यौ न च स्त्री नैव पृष्ठतः । तृणपूर्णमुखश्चैव तवास्मीति च यो वदेत्
शांतिपर्व अ० ९६–९८.

पावेलें. याजप्रकारें करून राजा जो याणें परराष्ट्र जिंकून प्रजा ज्या त्यांनें पिता असा अपत्याचें पालन करिजे तो असे रीतीनें धर्मेंकरून व नीतीकरून दयाळुत्वें पालन करावें.

राजा यासि युद्धादिकाचेठायीं हिंसादि पातकें घडतात म्हणाल तर येविशीं इतिहास सांगतों. धर्मराज यांणीं भीष्मास प्रश्न केला कीं, राज्य करण्यांत नानाप्रकारचीं पातकें घडतात यास्तव क्षत्रियधर्मा इतका दुसरा कांहीं धर्म पापीयान् नाहीं. कांकीं यांत युद्धाचेठायीं ज्याचे पूजावंदन करावे त्याचाच वध करणे प्राप्त होतें व शिक्षार्थेही नानाप्रकारच्या हिंसा कराव्या लागतात. ऐसें असतां राज्य करण्यांत स्वर्गमोक्षप्राप्ति व्हावी असें यांत कर्म कोणतें आहे तेंच कृपाकरून सांगावें. याजप्रमाणें विचारिलें असतां भीष्म उत्तर करितात कीं, पापी आहेत त्यांस शिक्षा करून राजा यास पुण्यवंत असे प्रकारचे साधुजन आहेत त्यांचे [ व ] गाई ब्राह्मणांचें पालन घडतें. व आश्रमधर्में करून धर्मसंस्थापना होऊन प्रजेचे पालन करून राजे जे ते शुचित्व पावतात. व यज्ञही नानाप्रकारचे घडतात. दानें व्रतें घडतात. राजा यास जयसमयीं युद्धादिकाचेठायीं हिंसा व द्रोह घडतो. त्यास राजा जो तो प्रजापालन धर्में करून करितो येणें करून हें पातक राजा यासि नाहीं. प्रजेचें संरक्षण करणें हाच मुख्य क्षात्रधर्म होये. तेव्हां प्रजेस पीडा होतील त्यांचा परिहार करणें त्याचें पातक नाहीं. व हिंसा व द्रोह केला असें म्हणूं नये. प्रजा ज्या त्यांचें संरक्षण, पिता पुत्राचें करितो, तसे प्रकारें राजा येणें प्रजेचें पोषण पालन केलें असतां पुण्याची वृद्धिच होते. आणि प्रजा पालनविशीं संरक्षणार्थ द्रोह घडतात [ तर ] त्यांचे पालनें करूनच प्रायश्चित घडतें. राजा जो तो प्रजेस धनें करून व दानें करून व ज्ञातिधर्में करून व दुसरा कोणी पीडा करीत असेल त्याजपासोन, चोरापासोन व अन्य क्लेशापासून रक्षितो व प्राणदान करितो, हाच उत्कृष्ट धर्म घडतो. येणें करून या लोकीं संपूर्ण भोग भोगून परलोकाचेठायीं इंद्र-सलोकता पावतात. व ब्राह्मणांचें व गाईचें संरक्षणार्थ आपले प्राणाची व गृहदारादिकांची ममता न धरितां युद्धास प्रवर्तून ब्राह्मणादिकांचें पालन करितो हाच राजा यास अनंत-दक्षणायुक्त यज्ञ केल्याचें फळ घडतें. स्वर्गीचे ठायीं देव पृथ्वीचे ठायीं उत्कृष्ट धर्म कोणता म्हणून विचार करितात. त्यांत शत्रूचे बाण आपण सोसितात व शत्रूस आपण मारितात, प्राणाची गणना

---

५९. सेनानीति शांतिपर्वी अध्याय १०० मध्यें पहावी.

६०. राजा यानें परराष्ट्र जिंकिलें असतां आपल्यावर त्या जितराष्ट्राचा विश्वास बसण्याकरितां कसें वर्तन करावें तें शांतिपर्वी १०२ अध्यायाच्या शेवटीं पहावें.

६१. " क्षत्रियस्य परोधर्मः प्रजानामेव पालनम् " मनु ७-१४४.

न करितां प्रजापालन करितात, याजपेक्षां उत्कृष्ट धर्म कोणताही नाहीं म्हणतात. शरीराचेठायीं जितके व्रण क्षतें होतात त्या संख्येंकरून अक्षयी उत्तम लोकीं सुख भोगितात. संग्रामाचेठायीं ज्याचे शरीरापासोन रुधिर प्रवाह पडतो त्या रुधिरतीर्थीं स्नानें करूनच सकल पातकें भस्म होतात. संग्रामाचे ठायीं व्रणाच्या वेधना ज्या होतात त्या जे सोसतात त्या जशा तपें पंचाग्निसाधन इत्यादि करून वेधना सोसण्याचे श्रमापेक्षांही अधिक पुण्यदायक होतात. असें धर्मशास्त्रकर्ते बोलतात. ज्या शूरास स्वर्गसुखाची इच्छा असेल त्याणें महत्संकट युद्धाचेठायीं साह्याय्याची इच्छा न धरितांच युद्ध करावें. धर्मराजा रे ! जे आपले संगती युद्धाचेठायीं टाकून प्राणभयें करून स्वस्तिक्षेम घरास आले त्यांचें पालन व पोषण कदापि न च करावें. संग्रामाचेठायीं शूर सहाय्य सोडून आपले प्राण वांचवावे ऐसें इच्छितात त्यांजवर इंद्रादि देवता क्षोभातें पावून नरकादि अधःपातास त्यांस नेतात. शूर जे आहेत त्यांणीं आपणापाशील शस्त्रें अस्त्रें सरलींही असतां लांकडें करून अथवा पाषाणें करून युद्ध करावें, शेवट हस्तेंच करून प्रहार करावे, शेवट पशु जैसा पादें करून हस्तें करून शिरें करून दंष्ट्रे करून कारितात असे प्रकारेंही करावेंच. परंतु शत्रूस पराङ्मुख कदापि न व्हावें. क्षत्रियास हाच धर्म कीं घरीं खट्वा जे याचे ठायीं शय्येवरी कफ व श्लेष्मा आदीकरून रोगादि पीडा पावून परम श्रम भोगून मरण हेंच कोणी अधर्म होय. आतां क्षत्रियास मरण कसें घडावें म्हणाल तरि रणाचेठायीं कदन करीत होत्साता ज्ञाति जय हिंसा परिवेष्टित तीक्ष्ण शस्त्रें करून सर्वही आंग भिन्न जहालें आहे ऐसें होऊन मरण पावावें. हेंच श्रेयस्कर होय. शूरास नानाप्रकारचीं क्षतेंही झालीं असतां, आपले देहास कोठें काय जहालें हे भानही शूर जे यांस [ नसतें. ] कोठें कोणतेही भूमीचेठायीं युद्धांत मरण जालें असतां तेच भूमी त्यास महाक्षेत्र ऐसी होऊन अक्षय लोक पावतो. यास्तव राजधर्मच उत्कृष्ट होय. यांतच नीतीनें राजा वर्तेला असतां शास्त्र हेंच व ईश्वरी आज्ञा याजप्रमाणें. प्रजापालनधर्में करून, व ज्ञानें करून ईश्वरतत्व जाणोन, सर्वकाळ भक्ति व भजन एकाग्रें करून व गाई ब्राह्मणांची सेवा पालन करीत होत्साता मोक्षासही पात्रच होतो. याजप्रकारें ऐसें न करितां व राजा येणें राज्यरक्षणास योग्य पुत्र न जहाला असतांच राज्य त्याग केला तरि महत्पातकें त्याचे मस्तकीं. तीं कशीं म्हणाल तरि सांगतों. राजा येणें राज्याचा त्याग केला असतां संपूर्ण प्रजा व वर्णाश्रमधर्म आदि करून भ्रष्ट होतात. गाई व ब्राह्मणादि प्रजा यांस चोरादि पीडा होऊन वध होतात. तितकेही अधर्म राजा यासच घडतात. यास्तव राजा याणें राज्यच

करून चतुर्विध पुरुषार्थ धर्म अर्थ काम मोक्ष हे साधावे. असे प्रकारें करून धर्मराजाप्रति भीष्में सांगितलें आहे.[६२]

---

६२. शांतिपर्व अध्याय ९७ पहा.



अनुक्रमणिका

[ काव्येतिहास-संग्रह. ]

२३.

मल्हार रामराव चिटणीस कृत

# रा ज नी ति.

ही

यथामति शुद्ध करून अर्थ-द्योतक आणि अवांतर माहितीच्या

टीपांसह

काशिनाथ नारायण साने, बी. ए. ( डे० का० )

यांणीं

प्रकाशित केली.

राज्ञां वै परमो धर्म इति धर्मविदो विदुः ।
सर्वस्य जीवलोकस्य राजधर्मः परायणम् ॥
शांतिपर्व-५६.

शालिवाहन शके १८०९

इसवी सन १८८७

महाराष्ट्राच्या भाषेचा व इतिहासाचा आस्थापूर्वक
अभ्यास करूं पाहणाऱ्या सज्जनांस
हा ग्रंथ सप्रेम अर्पण करितों.

ग्रंथप्रकाशक.

ज्ञानप्रकाश छापखाना पुणें.



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिकारूप विषयसूचि.

पृष्ठ.

### राज्याभिषेक प्रकरण १.

विषयावतरण ... ... ...१
राजा म्हणजे काय ? ... १
राज्याभिषेक कोणास केव्हां करावा ? ... ... ...१–२
त्यास मुहूर्त ... ... ...२–३
राज्याभिषेकविधि–हवन–स्नानें–भद्रासनारोहण–प्रधान-संस्था–मूर्धाभिषेक... ...३–४
पुरोहितादिपूजा ... ...४–५
पटबंधनविधि आणि सिंहासनारोहण ... ... ... ५
नगरदेवतादर्शनाचा समारंभ-पुरोहितादिपूजन–मंगलालंभन-अग्निप्रदक्षिणा-वृषभादि-स्पर्श-गजपूजा–गजारोहण-प्रस्थान-सेनानिवेश-पापपुरुषवध-निवर्तन-बंधमोक्ष-राज्ञीसंमान ... ... ...५–६

### सिंहासन सभा प्रकरण २.

दुर्गभूमि कशी असावी ? ... ७–८
नगरभूमिवर्णन ... ... ... ८
दुर्गवर्णन... ... ... ... ८
सभावर्णन ... ... ... ९
सिंहासनवर्णन ... ... ... ९
सभाप्रवेश–सिंहासनारोहण... ९–१०
सभेंत प्रधानादिकांचीं स्थानें–राजकृत्यें ... ... ... १०–१२

### राजगुण प्रकरण ३.

राज्याचीं सप्तांगें ... ... १२
राजवर्णन... ... ... ... १२–१३
चतुर्विध राजवृत्त ... ... १३
द्रव्यसंपादन ... ... ... १३
द्रव्यवर्धन ... ... ... १३
द्रव्यरक्षण ... ... ... १३–१४

पृष्ठ.

द्रव्यव्यय ... ... ... ... १४
विनीत्यादि राजगुण ... ... १४–१५
इंद्रियनिग्रह ... ... ... १५–१६
परस्त्रीकामनानिषेध ... १६–१७
कामादि षड्वर्गांचा त्याग ... १७
गुरुसेवा ... ... ... ... १७
आन्वीक्षिक्यादि विद्याचतुष्टय १७–१८
हिंसापरित्याग ... ... ... १८
सत्संगतिप्रशंसा ... ... १८–१९
मधुरवाक्यप्रशंसा ... ... १९
शुचिता, समता, सरलत्व ... १९
उत्साहादि-परिशीलन—पारुष्यादि-त्याग ... ... ... २०
राजव्यसन-प्रकार... ... ... २०–२१
पान-निंदा... ... ... ... २१
द्यूतनिर्भर्त्सना ... ... ... २१
मृगयादिकांचे दोष ... ... २१–२२
प्रजांचे ठायीं अपत्यभाव—इतर गुण ... ... ... ... २२–२३
वेतनदान... ... ... ... २३
गुणिजन-सत्कार–राजदोषवर्णन २३–२४
सभासद ... ... ... ... २४
राज्ञी-गुण-वर्णन ... ... २४

### अमात्य प्रकरण ४.

त्रयोदश राजमंडल ... ... २५
युवराज-गुणवर्णन ... ... २५–२६
राजपुत्र-रक्षा ... ... ... २६
अमात्य-प्रकार ... ... ... २७
अमात्य-गुण-वर्णन ... ... २७–२८
प्रधानकृत्य ... ... ... २८–२९
सेनापतिकृत्य ... ... २९
अमात्यकृत्य ... ... ... २९
सचिवकृत्य ... ... ... २९
मंत्रिकृत्य ... ... ... २९
सुमंतकृत्य ... ... ... २९
छांदोगामात्यकृत्य ... ... २९–३०

पृष्ठ.

न्यायप्रधानकृत्य... ... ... ३०
राजा व प्रधान यांचें अन्योन्य कर्तव्य ... .. ... ३०-३१
पुरोहित-लक्षण ... ... ... ३१
ज्योतिषी ... ... ... ३१
पत्रलेखक-गुण ... ... ... ३१
गणक लेखक-गुण ... ... ३१-३२
सुहृल्लक्षण ... ... ... ३२
सेना-गणक ... ... ... ३२
इतर अधिकारी ... ... ३३
भांडारगृहाधिकारी ... ... ३३
वसनागाराधिकारी ... ... ३३
रत्नागाराधिकारी ... ... ३३
शस्त्रागाराधिकारी ... ... ३३
धान्यागाराधिकारी ... ... ३३-३४
गजशालाधिकारी ... ... ३४
अश्वशालाधिकारी ... ... ३४
उष्ट्रशाला-गोशालाधिकारी ... ३४
देश-प्रांताधिकारी ... ... ३४-३५
गणक-लेखक-कृत्य ... ... ३५
ज्याकडे जें काम त्यापासूनच तें घ्यावें ... ... ... ३५
निद्रामंदिरादिकांचे अधिकारी कसे असावे ? ... ... ३५
पदाति-नायक ... ... ३५
नौकाधिपति... ... ... ३६
अश्वगजादिशिक्षक... ... ३६
अग्नियंत्राधिकारी ... ... ३६
सेवकगुणकथन आणि सेवक-वर्तन ... ... ... ३६-३८

राजाह्निक प्रकरण–५–पूर्वार्ध.

वाद्यश्रवण--पूर्वक उठणें ... ३८-३९
शौचविधि दंतधावनादि कृत्य ३९
स्मश्रु–स्नानविधि ... ... ३९
तिलकधारण—नित्यदानादि. ३९-४०
सभाप्रवेश ... ... .. ४०
युक्त–दण्ड-प्रशंसा ... ... ४०-४१
अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, आणि देशाचार पाहून न्याय ... ... ... ४१-४२

राजाचें पंच महायज्ञ आणि अष्ट कर्में ... ... ... ४२
पंचवर्ग ... ... ... ४२-४३
त्रिविध उपाय ... ... ४३
भोजनविधि-आणि भोजन-गृहरक्षा—विषपरीक्षादि ४३-४५
अंतःपुरविहार ... ... ... ४५
मृगया ... ... ... ... ४५
राजखड्ग... ... ... ... ४५-४६
मृगयागुणवर्णन ... ... ४६
जलमृगया... ... ... ... ४६
स्थलमृगया ... ... ... ४७
अंतरिक्षमृगया ... ... ... ४७
अंतःपुरप्रवेश ... ... ... ४७

राजाह्निक प्रकरण–५–उत्तरार्ध.

चारवृत्तश्रवण ... ... ... ४८
चारगुण ... ... ... ४८-४९
भोजनविधि... ... ... ४९
आयव्ययश्रवण ... ... ४९
एकांतस्थळीं विचार–गुप्तसभा ४९-५०
षड्गुण–संधिलक्षण–संधिप्रकार-बलवत्संधि-मित्रसंधि–संधि-करण्यास वर्ज्य कोण ?... ५०-५२
विग्रहप्रकार... ... ... ५२
यानप्रकार ... ... ... ५२-५३
आसनप्रकार... ... ... ५३-५४
द्वैधीभाव ... ... ... ५४
संश्रय... ... ... ... ५४
मित्र—शत्रु—उदासीन ... ५४-५५
मित्रादिकांचे प्रकार ... ... ५५
शत्रुप्रकार ... ... .. ५५-५६
मित्रप्रकार ... ... ... ५६
पार्ष्णिग्राह ... ... ... ५६
उपायचतुष्टय ... ... ... ५६
अंतःपुरशोधन ... ... ५७
स्त्रीक्रीडा ... ... ... ५८
राजान्हिकाचा गोषवारा ... ५८-५९

कोश प्रकरण–६.

द्वादश कोश आणि अष्टादश–शाळा–द्रव्यसंपादन ... ५९

पृष्ठ.

कोशमाहात्म्य–कोशरक्षण ... ५९
राष्ट्ररक्षण–करग्रहण ... ... ६०–६२
दुर्गप्रकार–दुर्गरक्षा ... ... ६२–६३

**बल प्रकरण–७.**

दैव आणि पुरुषप्रयत्न यांची तु-
लना—पुरुषप्रयत्नाचें श्रेष्ठत्व ६३–६५
षड्विध बललक्षण ... ... ६५
मौलबल ... ... ... ६६
भूतसैन्य... ... ... ... ६६
श्रेणीबल ... ... ... ६६
मित्रसैन्य ... ... ... ६६
शत्रुबल... ... ... ... ६६
अटवीबल ... ... ... ६६
गजप्रकार ... ... ... ६६–६७
गजलक्षणें ... ... ... ६७–६९
गजशालेस भूमि ... ... ६९
गजशाला-मान ... ... ६९
बंधनस्तंभादि प्रकार... ... ६९–७०
अश्वलक्षण ... ... ... ७०
अश्वाचें फुलणें ... ... ७०–७१
अश्वाचें हिंसणें ... ... ७१
पदाति सेना... ... ... ७१–७२

पृष्ठ.

शत्रूच्या बलाबलाचीं चिन्हें.. ७२–७३
शत्रु-भेद ... ... ७३
दूत-प्रेषण—दूतप्रकार—दूतवर्तन ७३–७५
चारलक्षण–चारगुण... ... ७५–७६
योधलक्षण ... ... ... ७६
प्रयाणप्रकार.... ... ... ७६–७७
शुभाशुभ चिन्हें ... ... ७७–७९
स्कंधावार ह्मणजे गोट ... ७९–८०
युद्धभूमि ... ... ... ८०
सेनापतिलक्षण ... ... ८०–८१
सेनापतिकृत्य... ... ... ८१
सेना व्यूह ... ... ... ८१
व्यूहरचना ... ... ... ८१–८२
कपटयुद्ध ... ... ... ८२–८३
धर्मयुद्ध ... ... ... ८३
योधप्रोत्साहन.. ... ... ८३–८७
धर्मयुद्धप्रकार.. ... ... ८७
शूरसत्कार ... ... ... ८७–८८
राजाच्या हिंसादि पातकांविषयीं
शंका व तिचें समाधान–
समाप्ति ... ... ... ८८–८९


**समाप्त.**



# वडगांवकर जयरामस्वामी व त्यांचे शिष्य प्रशिष्य ह्यांचे चरित्रांची बखर.

स्वस्ति श्रीगुरुभक्तिपरायण राजमान्य राजश्री कृष्णाप्पास्वामी, जयरामस्वामी, गोपाळस्वामी, विठ्ठलस्वामी, मुनीश्वरस्वामी, व महादेवस्वामी यांचें वास्तव्य पूर्वीं कोणते ठिकाणीं व वडगांव येथें काय निमित्त वास्तव्य झालें, वडगांव येथें राहून काय कीर्ति केली ती येथें यथामतीनें सांगतों.

## श्रीशांतलिंगस्वामी.

जयरामस्वामी यांचे गुरु श्रीकृष्णाप्पास्वामी हे पूर्वीं राहणार वारूळबाणें येथील कुळकरणी. यांणीं कित्येक दिवस प्रपंचपरमार्थ करून वृत्ति उदासीन असून गुरुकृपासंपादन करून घ्यावी म्हणून गुरूचा शोध करीत करीत श्रीशंभुमहादेव येथें आले आणि शंभुमहादेव यांची यात्रा करून श्रीशिखरसिंगणापुरास आले. तों तेथें कोणी भाविक लोक होते त्यांनीं सांगितलें कीं, येथें श्रीशांतलिंगस्वामी हे गुरु करण्यास फार योग्य आहेत. त्यांच्या जन्मांतराचा विचार [ पुसाल ] तर [ ते ] भागीरथीचे बेटावर सांपडले. त्यांची तपश्चर्या पाहातां श्रीशंभुमहादेव यांचे बरोबर दिसते. त्याजवरून श्रीशांतलिंग गुरु करण्यास फार योग्य आहेत असें सांगितल्यावरून मोठा विश्वास होऊन फार आनंद झाला. मग कृष्णाप्पास्वामी आपले रुमालानें हात बांधून श्रीशांतलिंग यांसि शिरसाष्टांग नमस्कार करून हात जोडून पुढें उभे राहिले. आणि [ प्रार्थना ] करिते झाले कीं, माझा लेंकराचा अधिकार न पाहातां माझे मस्तकीं हात ठेवून माझें मजला स्वरूप भेटवावें. इतकी माझी इच्छा आहे या खेरीज मजला कांहीं एक नको. अशी प्रार्थना करून सन्मुख हात जोडून पुढे उभे राहिले. नंतर श्रीशांतलिंगमहाराज यांनीं आपल्या दृष्टीनें अवलोकन करून श्रीकृष्णाप्पास्वामीचें अंतःकरण असेंच आहे कीं काय असा विचार पाहून मनांत विचार करून म्हणूं लागले कीं, आमचे पांच असामी शिष्यें आहेत परंतु त्यांजमध्यें असा गुरुभक्त शिष्या नाहीं. असा विचार करून श्रीशांतलिंग यांणीं कृष्णाप्पास्वामी यांचे हातास धरून एकांतस्थानीं नेऊन मस्तकीं हात ठेवून स्वरूपीं शिष्याची भेट करून देऊन गुरुकृपेचा महिमा एक निमिषांत कृष्णाप्पास्वामी यांस दाखविला. आणि त्यांस सांगितलें कीं, ज्या स्वरूपाची तुजला भेट करून दिली त्या स्वरू-

याची आणि तुमची तुटी कदापि ही होणार नाहीं. असें आशीर्वचन देऊन त्यांस सुखी केलें. नंतर कांहीं दिवस तेथें राहून नंतर आपल्या गांवास परत गेले.

आणि तेथें राहून एक नेम केला कीं, दर महिन्यास एकादशीस श्रीशंभुमहादेव येथें जाऊन श्रीशांतलिंगगुरु यांचें दर्शन घेत जावें. श्रीशांतलिंग यांचे दर्शनास जातांना वडगांवाहून जाण्याचा नेम केला. वडगांव येथील वतनदार कुंदाजी पाटील हा परम भाविक ब्राह्मणभक्त असा श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे खात्रीस येऊन एकमेकांची प्रीति फार झाली. असे कांहींएक दिवस झाले. नंतर संतसमागम याचे महात्म्येंकरून कुंदाजी पाटील याचे अंतःकरणास फार वैराग्य उत्पन्न होऊन कोणे एके दिवशीं श्रीकृष्णापास्वामी गुरूचे भेटीस जात असतां कुंदाजी पाटील यांची गांठ पडून परम नम्रतेनें हात जोडून प्रार्थना केली कीं, माझे मस्तकीं हात ठेवन मजला उपदेश करावा, अशी प्रार्थना केली असतां कृष्णाप्पास्वामींनीं त्याचे अंतःकरणास शुद्धता देऊन त्याजला उपदेश करून आपल्या गुरूच्या भेटीस निघोन गेले. मग कुंदाजी पाटील यानें नेम केला कीं, कृष्णपक्षींचे एकादशीस गुरुदर्शनास जावें. असा कितीएक दिवस नेम चालविला. मग कुंदाजी पाटील याच्या शरीरास इजा प्राप्त होऊन नेम न चालेल अशी वेळ दिसून आली. तों कृष्णाप्पास्वामी शुक्ल पक्षीं गुरूच्या भेटीस जाण्यास आले. हें वर्तमान कुंदाजी पाटील यास कळलें. नंतर कृष्णाप्पास्वामी यांसि शिरसाष्टांग नमस्कार करून नेत्रांस अश्रुपात येऊन सन्मुख उभे राहिले असतां कृष्णाप्पास्वामी यांनीं त्याचे मुखाकडे पाहिलें. तों कुंदाजी पाटील याचें खिन्न वदन पाहून त्यास बोलले कीं, आज खिन्न होण्याचें काय कारण तें सांगितलें पाहिजे. असें कृष्णाप्पास्वामी यांनीं विचारिलें असतां हात जोडून प्रार्थना केली कीं, माझा नेम आपल्या दर्शनास यावयाचा राहिला. त्यानें असा विचार घडला त्यास माझा नेम न राहावा असें करावें. माझा हेतु पूर्ण आपल्या चरणीं आहे. माझे मनांतून हेतु असा आहे कीं, आपण वडगांव येथें रहावें म्हणजे माझा नेम शेवटास जाईल अशी आमची इच्छा आहे अशी प्रार्थना केली. मग कृष्णाप्पास्वामींनीं मनांत विचार केला कीं, असा आवडीचा शिष्या आहे त्यास त्याचा हेतु पूर्ण केल्यास उत्तम आहे. मग कुंदाजी पाटील यास सांगितलें कीं तुझ्या मनोदयानुरूप येथें रहातों.

मग वडगांव येथें राहून शुक्ल पक्षीं एकादशीस गुरूच्या दर्शनास जात असतां एके दिवशीं द्वादशीस स्वामींच्या निरूपणास गेले, तेथें श्रीशांतलिंग स्वामींची प्रकृत पाहिली तों फार ग्लान दिसली. नंतर हात जोडून विनंति केली

कीं, आपल्या शरीरास फार ग्लानि दिसते. अशी विनंति करून हात जोडून उभे राहिले. मग श्रीशांतलिंग महाराज आपल्या आसनावरून उठून नेत्रांवरून हात फिरवून सर्व वर्तमान सांगितलें कीं, माझी गोष्ट सांगणे आहे ती सर्वांनीं ऐकून काम करावें. मी पूर्वीं काशीयात्रा करावयास गेलों तेथें त्रिस्थळी यात्रा संपूर्ण केल्या आणि कांहीं दिवस तेथें वास्तव्य केलें. त्या वेळेस जवळचा एकंदर पैसा सरला. मग मी सावकार याचे घरास जाऊन यात्रा केल्याचें पुण्य त्याजपाशीं गहाण ठेवून ३०० रु० घेऊन वाटेस खर्च करीत आलों आणि त्याजला अडत लिहून दिलीं आहे कीं, आम्ही तुमचे व्याजसुद्धां रुपये दिल्यास यात्रेचें पुण्य आम्हांस; रुपये न दिल्यास यात्रेचें पुण्य तुम्हांस; आम्ही तुमचे रुपये देऊन आपलें खत काढून घेऊन जाऊं. असें सावकार यास सांगून खत लिहून देऊन रुपये कर्ज घेतले आणि कांहीं दिवस तेथें राहून नंतर निघून आपल्या गांवास आलों. त्यास हल्लीं आमचा प्रयाणाचा समय, प्रहरानें परमात्मस्वरूपीं मिळोन जाणार; त्या प्रहराच्या आंत ३०० रुपये व्याजासुद्धां घेऊन जाऊन कोणे एका शिष्यानें आमची चिटी काढून आणावी म्हणजे त्याची सेवा पूर्ण झाली. अशी गुरूंनीं गोष्ट सांगितली असतां सर्व शिष्ये मिळून उत्तर देतात कीं, ही गोष्ट अंगीकारावी तर ६ महिन्यांची वाट, एका प्रहरांत जाऊन परत येणें कसें होणार ! त्यातून शिष्ये कित्येक म्हणूं लागले कीं, आम्ही एक महिन्याचे आंत जाऊन येऊं, यापेक्षां आमच्या हातून अधिक गोष्ट होणार नाहीं असें म्हणून सर्व शिष्ये स्वस्थ उभे राहिले.

तों इतक्यांत कृष्णाप्पास्वामी यांनीं ऐकून स्वामींस प्रार्थना केली कीं, आपण महाराज जी आज्ञा कराल ती. पापणीस पापणी न लागतां सावकाराचे घरची चिठ्ठी व स्वदस्तुरची पावती आणून देतों. येथें प्रहराचा अवकाश आहे. आपले आज्ञेच्या सामर्थ्यें करून स्वर्ग, मृत्यु, आणि पाताळ या तिहीं लोकांत जाऊन येईन. काशींतील चिठ्ठी आणावयास काय आश्चर्य आहे. गुरूंची आज्ञा मात्र असावी. असें उत्तर बोलून कृष्णाप्पास्वामी सन्मुख उभे राहिले. हें उत्तर सद्गुरुनाथ यांनीं श्रवण करून नेत्र उघडून पाहिलें. तों कृष्णाप्पास्वामी आज्ञेची वाट पाहात उभे राहिले असें जाणून अंतःकरणास हुशारी वाटून आसनाखालीं हात घालून व्याजसुद्धां रुपये मोजून पिशवींत घालून कृष्णाप्पास्वामी यांस सांगितलें कीं, आमचे रुपये घेऊन काशीस जाऊन सावकाराचे रुपये व्याजसुद्धां देऊन त्याजपाशीं आमचें खत आहे तें काढून त्याच्या स्वदस्तुरची पावती घेऊन यावें.

असें सांगतांच कृष्णाप्पास्वामी यांनीं श्रीशांतमहाराज यांचे चरणावर म-

स्तक ठेवून रुपयांची गांठोडी बांधून निघाले ते महादेवाचे तळ्यापाशीं येऊन हात जोडून उभे राहून श्रीसद्गुरुनाथ यांच्या चरणाचें ध्यान करून गुरूस नमस्कार करून तळ्यांत उडी टाकिली आणि तेथून काशीस मनकर्णिके-च्या घाटावर प्रगट झाले आणि वर निघाले. सावकाराचें घर विचारीत गेले तों सावकार आपले गादीवर बसला आहे. इतक्यांत कृष्णाप्पास्वामी याणीं सर्व मजकूर कळवून रुपयांची पिशवी काढून पुढें ठेवून त्यांतील कागद दिला तो सावकारानें वाचून पाहिला. त्या कागदांत मिति त्या दिवसची पाहून श्रीकृष्णाप्पास्वामी यांस म्हणूं लागले कीं, आज मितीचा कागद आणि तुम्ही आज येथें कसे आलां असें विचारलें. तेव्हां कृष्णाप्पास्वामी बोलले कीं, आमचे येण्याचा मजकूर विचारण्याचें कारण काय ? तुम्ही आपला ऐवज घेऊन पावती द्यावी. असें बोलल्यावरून सावकार यानें मनांत विचार केला कीं, हा मनुष्याचा विचार कांहीं नाहीं. हे देवासारखे दिसतात. त्यास त्याचा ऐवज माघारा द्यावा व त्याचें खत ही माघारें द्यावें आणि ऐवजाबद्दल पावती ही द्यावी असा सावकार यानें मनांत विचार करून स्वदस्तुरची पावती व चिठ्ठी आणून पुढें ठविली. असें सावकार यानें केलें असतां स्वामी उत्तर करतात कीं, आमच्या गुरुची आज्ञा अशी आहे कीं, रुपये माघारे घ्यावयाचे नाहींत अशी आज्ञा आहे. असा त्यांचा पूर्ण निर्धार पाहून सावकार यानें रुपये शांतलिंगाचे खात्यास जमा करून खत व आपले स्वदस्तुरची पावती कृष्णाप्पास्वामी यांचे स्वाधीन केली आणि म्हणूं लागले कीं आम्हांस पंगतीचा लाभ देऊन उदयीक निघून जावें. मग स्वामी म्हणूं लागले कीं, आम्हांस क्षणभर राहण्याची आज्ञा नाहीं आम्ही आतांच निघालों. असें बोलले असतां स्वामी कसे जातात म्हणून स्वामी यांस घालवायाला मंडळीसुद्धां सावकार मनकर्णिकेचे घाटावर बरोबर आले. तों स्वामींनीं श्रीशांतेश्वर सद्गुरुनाथ यांचें स्मरण करून भागीरथींत उडी टाकिली हें सर्वत्रांनीं पाहून सावकार यास म्हणूं लागले कीं भगवद्भक्ताची लीला कांहीं आपणास कळावयाची नाहीं. असें म्हणून सावकार आपले घरास गेला. तों इकडे महादेवाचे तळ्यामधून जेथें उडी टाकिली होती तेथें उदकाचे बुडबुडे निघूं लागले ते तळ्याचे कांठीं जी मंडळी बसली होती ती पहात असतां श्रीकृष्णाप्पास्वामी तळ्यांतून एकाएकीं बाहेर निघाले [आणि]आपलें सर्व वर्तमान काशींतील झालें तें सर्वत्र आपले गुरुबंधु यांजपाशीं सांगितलें. मग सर्वांस परम संतोष होऊन मंडळीसुद्धां कृष्णाप्पास्वामी श्रीशांतलिंगस्वामीं-पाशीं येऊन त्यांचे चरणावर मस्तक ठेविलें. मग श्रीशांतेश्वरस्वामी यांनीं नेत्र उघडून पाहिलें तों श्रीकृष्णाप्पास्वामी पुढें उभे राहिले [ आहेत ] असें



अनुक्रमणिका

पाहून मोठा आनंद झाला आणि त्यांस म्हणूं लागले कीं, आज तुझ्या हातून श्रीगुरूची सेवा पूर्ण झाली आतां तूं पाहिजे तें माग मी तुजला प्रसन्न झालों. असें बोलल्यावरून श्रीकृष्णाप्पास्वामी म्हणूं लागले कीं, आपले चरणाची सेवा या खेरीज कांहीं एक इष्ट नाहीं तरी चरणसेवा अखंडित द्यावी. मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे मस्तकीं हात ठेवून त्यांस सांगितलें कीं तुझा हेतु पूर्ण होईल. आतां आजपासून तूं वडगांवीं राहून आमचें चिंतन करीत स्वस्थ असावें. मी तुझे हृदयस्थ असेन. असें आशीर्वचन कृष्णाप्पास्वामींस देऊन त्यांची पाठ थोपटून आपण सर्व मंडळी पाहात असतां श्रीकृष्णनामाचा उच्चार करीत स्वस्वरूपीं मिळोन गेले. हें सर्व मंडळी यांनीं पाहून फार आनंद उत्साह करून त्यांची समाधि बांधून सिंगणापूर येथें कांहीं दिवस कीर्तनसमारंभ करून आपापले गांवास जाते झाले.

## श्रीकृष्णाप्पास्वामी.

श्रीकृष्णांप्पास्वामी हे श्रीसद्गुरुनाथ यांचे आज्ञेवरून वडगांव येथें येऊन नित्य आपले गुरुचे चरणांचें ध्यान करीत राहिले. असें कितीएक दिवस श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं चालविलें. तों इंदापूर येथील ब्राह्मणाचे स्त्रीस दृष्टांत झाला कीं, तूं वडगांवास जाऊन श्रीकृष्णाप्पास्वामी आहेत त्यांचा उपदेश घ्यावा म्हणजे तुझें सर्व कार्य होईल. असा तिला दृष्टांत झाला. ती परम भाविक तिचें नांव काशीबाई. मग तिनें दृष्टांताचा विचार करून आपल्या पतीस बरोबर घेऊन वडगांवास आली आणि श्रीकृष्णाप्पास्वामींस साष्टांग नमस्कार करून परम नम्रतेनें हात जोडून उभी राहिली. तों इतक्यामध्यें श्रीकृष्णाप्पास्वामी ध्यानस्थ बसले होते तों काशीबाईच्या मुखांतील उत्तरें [ ऐकून ] ध्यान विसर्जन करून नेत्र उघडून काशीबाईकडे पाहिलें. ती परम भाविक प्रेमळ अशी दृष्टोत्पत्तीस येऊन तिच्या पतीसहवर्तमान आपले पर्णकुटीस घेऊन येऊन तिजला वृत्त विचारिते झाले. मग तिनें वृत्त सांगितल्यावरून तिजला पतीसहवर्तमान उपदेश करून तिचे मनोरथ पूर्ण करून तिजला सांगितलें कीं तूं आपले पतीसहवर्तमान गांवास जावें, वर्षांतून दोन वेळ दर्शनास येत जावें. असें सांगितल्यावरून काशीबाईनें स्वामींचा निरोप घेऊन आपले गांवास गेली. मग तिजला दोन पुत्र झाले. याप्रमाणें काशीबाईचा भाव कृष्णाप्पास्वामी यांचे ठायीं होता.

---

१ यांचे उपनांव अभ्यंकर हे उरुणाबादचे रहाणारे असें श्रीरामदासस्वामींचे बखरींत ३२ वे पृष्ठांत लिहिलें आहे.

पुढें पंढरीमध्यें भिक्षा मागून काशीबाईनें पुत्र जयरामस्वामी यांची मुंज केली. मग कांहींएक दिवसांनीं जयरामस्वामी यांची मातोश्री काशीबाई यांस देवाज्ञा झाली. ते वेळेस जयरामस्वामीचें वय आठ वर्षांचें होतें. मग जयरामस्वामी यानें श्रीपंढरीनाथ याचे देवालयांत जाऊन साष्टांग नमस्कार घालून उभा राहून प्रार्थना केली कीं, आई मेली बाप मेला आतां तूं सांभाळीं विठ्ठला. अशी प्रार्थना करून तेथून निघून गोपाळपुरास गेले आणि तेथें अनुष्ठान करीत बसले. त्यास कित्येक दिवस झाले. नंतर एके दिवशीं रात्रीं आपले गुहेमध्यें ध्यानस्थ बसले आहेत तों पांडुरंगानें येऊन सांगितलें कीं, उदयीक आपण चंद्रभागेचें स्नान करून येते वेळेस चंद्रभागेची दरड ढांसळेल ते वेळेस मी तुझ्या हृदयामध्यें प्रगट झालों अशी खूण जाण. असें स्वामींस समाधींत पांडुरंग यांनीं सांगून आपण गुप्त झाले. तों स्वामींची समाधि विसर्जन होऊन नेत्र उघडून पाहिलें. तों सूर्योदय झाला असें पाहून स्नानसंध्येचा विधि सारून माघारे यावयास लागले तों पांडुरग यांनीं समाधींत सांगितल्याप्रमाणें चंद्रभागेची दरड ढांसळली. तें स्वामींनीं पाहून आपले मनांत फार आश्चर्य केलें कीं, मजला दृष्टांत सांगितल्याप्रमाणें दरड ढांसळली. परंतु माझी वृत्ति कांहींच फिरली नाहीं. असें म्हणून स्वामी आपले गुहेमध्यें गोपाळपूर येथें जाऊन आपले आसनावर अनुष्ठानास बसले. त्यास कित्येक दिवस झाले. मग एके दिवशीं श्रीपांडुरंग यांनीं जयरामस्वामी यांस आसनासुद्धां उचलोन रंगशिळेवर आणून ठेविलें. हें स्वामींस कांहींच माहीत नाहीं. तों शेजारतीचा गजर व चौघडा वाजत होता तो स्वामींचे समाधींत कर्णावर पडला. मग त्यांनीं नेत्र उघडून पाहिलें तों श्रीविठ्ठलाची मूर्ति पुढें उभी राहिली आहे असें पाहून उठून उभे राहून हात जोडून प्रार्थना केली कीं, काय ही गारुडीविद्या? येथें गुप्त व्हावें तेथें प्रगट व्हावें? अष्ट सिद्धि आपणास मिळाव्या म्हणून [ मी ] अनुष्ठान करीत बसलों नाहीं अशी प्रार्थना करून तेथून निघून चंद्रभागेचें स्नान करून आपले जाग्यास गोपाळपुरीं जाऊन अनुष्ठान करावयास लागले.

मग एके दिवशीं पांडुरंग यांनीं फकिराचा वेष घेऊन बायको, मुलें, कोंबडीं,

---

२. श्रीरामदासस्वामींचे चरित्रांची बखर शके १७९२ सालीं गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिली आहे तिचे ३२ वे पृष्ठांत लिहिलें आहे कीं "जयरामस्वामी हे कात्राबाद मांडवगण एथील देशपांडे भिकाजीपंत यांचे पुत्र, यांची मातोश्री कृष्णाबाई, व उपनांव केशर."

३. अशीच गोष्ट रामदासस्वामींविषयीं श्रीदत्तात्रेयांचे संबंधानें रामदासस्वामींचे बखरीचे ८८ वे पृष्ठांत आहे.



अनुक्रमणिका

बकरी आणि रेडा अशी सामग्री बरोबर घेऊन गोपाळपूर येथें स्वामी अनुष्ठान करीत बसले होते तेथें जाऊन उतरले. मग फकिरीण हिनें गारुड्यास सांगितलें कीं, मुलांस भूक लागली आहे, त्यास तीं मुलें रडतात. असें तिचें भाषण ऐकून गारुडी यानें तेथें चूल करून त्याजवर हांडी चढवून फकिरीण हिजला सांगितलें कीं, आपल्यापाशीं कोंबडीं आहेत तीं हांडीत घालावीं व शिजवून मुलांस खाऊं घालावीं. असें सांगतांच फकिरीण हिनें आज्ञेप्रमाणें केलें. परंतु हांडी कांहीं भरली नाहीं. मग आपले साहीस हाक मारून म्हणूं लागली कीं हांडी कांहीं भरली नाहीं. मग तिजला सांगितलें कीं, रेडा कापून हांडींत घालावा म्हणजे हांडी भरेल अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणें केलें असतां हांडी कांहीं भरेना. मग हाक मारून सांगितल्याप्रमाणें केलें, परंतु हांडी कांहीं भरली नाहीं असें बोलली तेव्हां आपलीं मुलें हांडींत कापून घालावीं असें सांगतांच तिनें मुलें कापून हांडीत घातलीं. हें वर्तमान ब्राह्मणमंडळी अनुष्ठान करीत बसली होती त्यांनीं पाहून आपापले ठिकाणीं भयभीत झाले. तों इकडे फकिरीण हिनें आपले साहीस सांगितलें कीं, आपले आज्ञेप्रमाणें मुलें कापून हांडींत घातलीं परंतु हांडी कांहीं भरत नाहीं. असें सांगितलें असतां फकिरानें आपले हातांतील शस्त्र फकिरिणीच्या हातांत देऊन येथें पांचपन्नास ब्राह्मणमंडळी अनुष्ठानास बसली आहे ती एकंदर कापून हांडींत घाल म्हणजे हांडी भरेल अशी आज्ञा तिजला केली. ती संपूर्ण ब्राह्मणमंडळी यांनीं श्रवण करून फार भयभीत होऊन सर्व ब्राह्मणमंडळी पळून गेली आणि तेथून निघून अर्ध कोसावर जाऊन म्हणूं लागले कीं, आपलीं मुलें आपल्या हातून कापून घातलीं तिजला आमची दया कशी येईल ! आतां अनुष्ठानाचें फळ लांब राहिलें, येथें मरणसमय प्राप्त झाला आहे असें म्हणून ब्राह्मण निघोन गेले. असो. मग इकडे फकिरीण हिनें साहीस सांगितलें कीं, संपूर्ण ब्राह्मण मंडळी पळून गेली. तेथें एक ब्राह्मणाचें मूल आठ वर्षांचें लंगोटबंध मात्र हातामध्यें तुळशीची माळ घेऊन जप करीत बसलें आहे असें सांगितलें. मग फकिरानें तिजला सांगितलें कीं, तें ब्राह्मणाचें मूल अनुष्ठान करीत बसलें आहे तेथें जाऊन त्याचा शिरच्छेद करून हांडींत घाल. अशी आज्ञा होतांच त्या मुलाच्या जवळ जाऊन त्या मुलाकडे अवलोकन करून पाहिलें तों नेत्र झांकून ध्यानस्थ बसलें होतें. असें तिनें पाहून त्या मुलाचे हात धरून जागृत केलें आणि म्हणूं लागली कीं, मजकडे पहा. मी तुजला मारावयास आलें आहें. असें म्हणून हातांत खड्ग घेऊन हात उगारिला. हा सर्व वृत्तांत स्वामींनीं पाहून कांहीं भय न धरितां तिजला बोलूं लागले कीं, मजला मातोश्रीचे हातून मृत्यु

येतो हें फार चांगलें आहे. कधीं तरी मरण आहे. आज आपण रुक्मिणी माता प्रत्यक्ष वध करितां ही गोष्ट फार चांगली आहे. या योगानें माझा उद्धार होईल. पुनरपि मजला श्रीविठ्ठलाची भक्ति याच क्षेत्रीं घडेल असें म्हणून निर्भयपणानें तिच्यापुढें मान केली. हा सर्व विचार फकिरानें अवलोकन केला आणि त्याच्या जवळ येऊन अंतःकरण पाहून सर्व माया दाखविली ती नाहींशी करून आपण चतुर्भुज रूप धारण करून पुढें उभे राहिले आणि जयरामस्वामी यास म्हणूं लागले कीं, नेत्र उघडून मजकडे अवलोकन कर. मग त्यानें पाहिलें तों शंखचक्रपीतांबरधारी कटीं कर ठेवून पुढें पांडुरंगाचें स्वरूप पाहून स्वामीस मूर्च्छा आली. मग श्रीहरींनीं कृपावलोकनें करून मस्तकावरून व नेत्रांवरून आपला कृपाकर फिरवून स्वामींचें अंतःकरण निर्भय केलें आणि आपले गंभीर वाणीनें जयरामस्वामी यांस म्हणूं लागले कीं, तूं माझें स्वरूप पहा, मी तुजला प्रसन्न झालों, जें इष्ट असेल तें मजला माग, मी तुजला देईन. असें भाषण श्रवण करून जयरामस्वामी यांनीं स्वरूप पाहून साष्टांग नमस्कार घालून हात जोडून श्रीहरीचें स्वरूप प्रसन्नमुख पाहून जयरामस्वामी यांनीं सद्गदित होऊन स्तोत्र करून श्रीहरीस विनंति केली कीं, मजला कांहीं एक इच्छा नाहीं. एक मात्र इच्छा आहे. ती श्रीहरीनें पूर्ण केली पाहिजे. ती कोणती असें म्हणाल तर सांगतों. मी कोण आहें तें माझें मजला कळवावें. हें श्रीहरीनें मजला द्यावें. ह्या खेरीज मजला कांहीं एक नको. असें बोलून मौन्य धरून उभे राहिले असतां मग पांडुरंग यांनीं त्यांचे मागण्याचा अभिप्राय जाणून त्याचा विचार करून स्वामींस म्हणाले कीं, तो जिन्नस आम्हापाशीं नाहीं तुझा गुरु कृष्णाप्पास्वामी वडगावीं आहे त्याजपाशीं आहे. त्यास शरण जावें म्हणजे ते तुम्हांस मी कोण आहें त्याचा अनुभव करून देतील. असें श्रीपांडुरंग यांनीं सांगितलें. मग जयरामस्वामी म्हणूं लागले कीं मी अज्ञान, मजला गुरूची गांठ पडोन गुरू मजवर कृपा कशी करतील असें बोलले. श्रीहरि म्हणूं लागले कीं, तूं आपले गुरूकडे जावें. मग जयरामस्वामी म्हणूं लागले कीं, वडगांव येथून किती दूर आहे. नंतर श्रीहरि बोलले कीं, येथून पश्चिम दिशेस दहा-गांवें आहे. तेथें माझा परम भक्त श्रीकृष्णाप्पा आहे त्यास तूं जाऊन भेट म्हणजे तुझे मनोरथ पूर्णतेस जातील. मी त्याजला तुझा सर्व मजकूर व तुझे शरीराची आकृति हीं सांगतों. असें म्हणून श्रीहरीनें जयरामस्वामी यांस निरोप देऊन गुप्त झाले.

मग जयरामस्वामी निघून वडगांवचे शिवेवर आले. हा मजकूर श्रीपांडुरंग यांनीं श्रीकृष्णाप्पास्वामी यांस कळविला. कृष्णाप्पास्वामी यांनीं मनांत

विचार केला कीं, जो शिग्या शिंवेवर आला आहे त्याचा अधिकार मोठा दिसून येतो. तर त्यास शिंवेपर्यंत आडवें जाऊन घेऊन यावें, असें म्हणून मंडळीस बरोबर घेऊन शिंवेपर्यंत गेले. मग एकमेकांची गांठ पडून ऐक्यता झाली. त्या वेळेस मोठा चमत्कार झाला. तो सांगतों. श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं आपला शिष्य जयरामस्वामी यास पांडुरंग आपणाकडे घेऊन आले म्हणून त्यास साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां जयरामस्वामी म्हणूं लागले कीं, हें विपरीत झालें. मग कृष्णाप्पास्वामी यांचे चरणावर दंडवत् प्रणिपात करून हात जोडून विनंति केली कीं, आतां स्वामींनीं माझा अधिकार न पाहतां मजवर कृपा करून मी कोण आहें हें मजला कळवावें. असें म्हणून जयरामस्वामी मौन्य धरून उभे राहिले. मग कृष्णाप्पास्वामी यांनीं जयरामस्वामी यांस आलिंगन देऊन त्यांच्या हातास धरून वडगांवास घेऊन आले आणि कितीएक दिवस उभयतांनीं वास केला. मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं आपला वृत्तांत पहिल्या पासून जयरामस्वामी यांस सांगितला. नंतर जयरामस्वामींनीं श्रीकृष्णाप्पास्वामींस पहिल्यापासून आपला वृत्तांत सांगितला.

मग एके दिवशीं त्यांचे हातास धरून भवानीशंकर यांच्या देवालयांत श्रीशंभूकडे मुख करून उजवे बाजूस खोली आहे तेथें बसवून त्यांचे मस्तकीं हात ठेवून मंत्रोपदेश केला आणि श्रीजयरामस्वामी यांस मी कोण हें कळविलें. मग त्याचा अनुभव घेत बावीस दिवसपर्यंत एका आसनावर बसते झाले. मग तेविसावे दिवशीं जयरामस्वामी यांस जागृत करून त्यास म्हणूं लागले कीं, आपण जगदुद्धारासाठीं अवतार केला आहे तरी जागृत होऊन जगदुद्धार करावा. असें श्रीकृष्णाप्पास्वामी व जयरामस्वामी भाषण करितात तों रहिमतपुर येथें राहणारे एकनाथ[१]स्वामींचे शिष्य यांस दृष्टांत झाला कीं, आम्हीं वडगांवांस आलों आहों तरी आपण तेथें यावें म्हणजे आपलें सर्व विचारावयाचें आहे तें सांगेन. असा दृष्टांत पाहून एकनाथस्वामी यांचे शिष्य जागृत होऊन एकमेकांशीं बोलूं लागले कीं, पूर्वीं एकनाथस्वामींची प्रार्थना केली कीं, आमचें कांहीं विचारावयाचें राहिलें तें आम्हांस सांगावें. मग एकनाथस्वामी यांनीं आम्हांस सांगितलें कीं, आतां या वेळेस आम्हांस सांगावयास अवसर नाहीं, एथून कांहीं दिवसांनीं वडगांव येथें अवतार घेऊन गुरुभक्तीकरितां राहणार आहें तेथ तुम्हीं यावें म्हणजे तुमचें मनोरथ पूर्ण होतील. मग आम्ही बोल-

---

१. एकनाथस्वामी शके १४७० त जन्मले व शके १५२१ त समाधिस्थ झाले. ह्यांचें एक उत्कृष्ट चरित्र रा० भांडारकर बाळकृष्ण सहस्रबुद्धे यांनीं इ. स. १८८३ त छापवून प्रसिद्ध केलें आहे तें पहावें.

लें कीं, आमचें वांचणें कसें होईल ? मग एकनाथस्वामी यांनीं सांगितलें कीं, मी अवतार घेईं तों पर्यंत तुम्हांस काळाचें भय नाहीं. असें म्हणून आपण जयरामकृष्ण असें स्मरण करून निजधामास गेले. या दृष्टांतावरून आम्हांस असें वाटतें कीं, आमचा हेतु पूर्ण करण्याविषयीं एकनाथस्वामी वडगांवास आले असें वाटतें. तर तुम्ही आम्ही श्रीसद्‍गुरुनाथ यांच्या भेटीस वडगांवास जाऊं चला. असें म्हणून उभयतां बहुत वयाचे पुरुष हातामध्यें काठ्या घेऊन रहिमतपुराहून वडगांवास आले आणि गांवांतील लोकांस विचारलें कीं, येथें कोणी भगवद्‍भक्त आला आहे काय ? मग त्यांनीं सांगितलें कीं, जयरामस्वामी या नांवाचा मूल एक कृष्णाप्पास्वामी यांजपाशीं आहे. असें सर्व लोकांनीं सांगितलें. मग उभयतां ब्राह्मण जयरामस्वामी यांच्या गुरूचें घर विचारीत गेले. नंतर जयरामस्वामी यांची व त्या उभयतांची एक दृष्टी होऊन गांठ पडली. मग जयरामस्वामी यांनीं त्या दोघांचीं नांवें घेऊन हाक मारिली आणि त्यांस जवळ बसवून म्हणूं लागले कीं, कान्हेरपंत व नारोपंत तुम्ही उभयतां स्वस्थ आहां ? या वेळेस विचारा म्हणजे मी सांगेन आणि तुमचें सर्व संकट दूर करीन. असें म्हणून एकांत स्थानीं नेऊन त्यांचा सर्व मजकूर ऐकून मनोरथ पूर्ण केले. मग उभयतां आपला गुरु एकनाथ यानें जयरामस्वामी या नामें करून अवतार घेतला हें खरें असें म्हणून साष्टांग नमस्कार घालून निघाले. इतक्यामध्यें कान्हेरपंत यांचा देह तेथें च स्वामीसन्मुख विसर्जन झाला. त्या जाग्यावर काशीविश्वेश्वर याचें देवालय आहे. व नारोपंत याचें देहविसर्जन अर्ध कोशावर नदींत आल्यावर झालें. यावरून असें वाटतें कीं, एकनाथस्वामी यांनीं गुरुसेवा करावी म्हणून वडगांव येथें अवतार घेतला.

मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं सर्व मजकूर पाहून बहुत संतोष होऊन जयरामस्वामी यांस बोलले कीं, तुमचा अवतार जगाचा उद्धार करावा यासाठीं झाला तर आपण तीर्थयात्रा करण्याच्या मिषानें संपूर्ण जगाचा उद्धार करावा हें ठीक आहे. असा आशीर्वाद सद्‍गुरुनाथ यांनीं देऊन वडगांव येथें राहते झाले. जयरामस्वामी यांनीं समाधिसुखांत असावें ही गोष्ट कोणास ही समजली नाहीं. अशी गोष्ट अवघड परंतु श्रीसद्‍गुरुनाथकृपेंचे महात्म्यें करून श्रीजयरामस्वामी यांस प्राप्त झाली. ती कशी तर जयरामस्वामी जेव्हां बसत होते व चालत होते व निद्रित असतां काय होत होतें ? हातामध्यें तुळशीची माळ [ स्मरणी ] मेरूपाशीं आली म्हणजे ती निद्रित असतां व जागृत असतां पुन्हा उलटणें [ आपोआप होऊन पुढें ] जपमाळ चालावी. हें सर्वत्र मंडळी

परंपरेनें सांगत आली त्याजवरून ही गोष्ट सांगितली ही जनकराजाखेरीज दुसऱ्यास प्राप्त झाली नाहीं. ती कशी तर जनकराजाचा एक पाय अग्नींत जळत होता व एक पाय स्त्रीचे मांडीवर ठेविला होता तो तिनें आपले हातानें सदा सर्वकाळ चोळीत बसावें. परंतु जनकराजानें दोन्ही पायांचें सुखदुःख मनांत कांहीं न आणतां आनंदांत सदा सर्वकाळ असावें तसें जयरामस्वामी यांणीं कोणी भाविक लोक आले म्हणजे त्यांजबराबर राहावें. ही गोष्ट श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे आशीर्वादें करून प्राप्त झाली.

असें कितीएक दिवस झाल्यानंतर एके दिवशीं नरसोबाआप्पा गोसावी, आप्पा गोसावी, व रेवुबा गोसावी असे तिघे मिळून वडगांवास आले आणि श्रीकृष्णाप्पास्वामी व जयरामस्वामी यांचे दर्शन घेऊन त्रिवर्ग यांनीं हात जोडून स्वामीपाशीं विनंति केली कीं, स्वामींनीं कृपाळू होऊन आमचे मस्तकीं हात ठेवून उद्धार करावा. अशी विनंति केल्यावरून श्रीजयरामस्वामी त्यांजपाशीं न बोलतां मौन्यरूप धरून समाधिस्थ बसले. असें पाहून त्रिवर्गांनीं हात जोडून विनंति केली कीं, आपण आतां दुसरा गुरु करणें नाहीं, तर स्वामींनीं कृपाळू होऊन उपदेश केला [ पाहिजे ] असें भाषण करून सन्मुख उभे राहिले. नंतर स्वामींनीं त्रिवर्गांचा विचार आपले मनांत आणून उपदेश केला आणि गुरुकृपेचा काय महिमा होता तो त्यांजला दाखविला आणि त्यांच्या अंतःकरणाची खात्री करून गुरूच्या सेवेची त्यांस आज्ञा दिली.

कोणे एके दिवशीं कृष्णाप्पास्वामींनीं जयरामस्वामी यांस हाक मारून सांगितलें कीं, आज पावेतों या लोकामध्यें वर्तणूक केली. आतां पंचभूतात्मक देह त्यागून स्वरूपस्थितींत अखंडित योग करून एकांत स्थानीं गुहेंत राहावें असा मनोदय प्राप्त झाला आहे. तर आपण सर्वत्र मंडळी जमा करून एक विचार करणें. असें श्रीकृष्णाप्पास्वामी जयरामस्वामी यांस हाक मारून सांगून आपण ध्यानस्थ राहिले. नंतर जयरास्वामी यांस परम चिंता प्राप्त झाली कीं, मजला आजपर्यंत आईचें व बापाचें व सर्व आप्त मंडळीचें कांहीं स्मरण होऊं दिलें नाहीं. मजला यांचे पायांच्या आश्रयेंकरून फार सुख प्राप्त झालें आहे. असा विचार करीत करीत फार रात्र झाली. तों श्रीजयरामस्वामी यांचे ध्यानसमयीं तीच गोष्ट पुन्हा कृष्णाप्पास्वामी यांनीं स्वमुखें सांगितली कीं, तुजला त्रिकाळ दर्शन देईन. तूं कांहीं एक काळजी करूं नको. असें सांगितलें. मग जयरामस्वामींनीं ती रात्र गेल्यावर प्रातःकाळीं स्नान करून श्रीकृष्णाप्पास्वामी यांची पूजा करून मूर्ति पुढें ठेऊन षोडशोपचारें पूजा करून भगवच्चिंतनास आरंभ केला. तों मुरलीधराची मूर्ति सन्मुख भाषण

करूं लागली कीं, कृष्णाप्पास्वामींनीं तुजला जी आज्ञा केली त्या प्रमाणें वर्तणूक करावी. मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांची आज्ञा शिरसा वंद्य करून जयरामस्वामींनीं आसनावरून उठून आपल्या शिष्यांस हाक मारून सांगितलें कीं, या गांवचा अधिकारी कुंदाजी पाटील तो आमचा गुरुबंधु आहे त्यास हाक मारावी असें सांगितलें. मग पाटील यांस बोलावून आणून कृष्णाप्पास्वामी यांजपाशीं नेऊन पाटील यांस स्वामींनीं सर्व मजकूर सांगितला. मग पाटील यानें तो मजकूर शिरसा वंद्य करून कांहीं अंतःकरणास क्षणभर खेद करून आपला गुरुबंधु एक पाथरवट होता त्यास बोलावून टांकीनें धोंडे फोडून बारीक घडून भूमीमध्यें गुहा करविली. नंतर जयरामस्वामींस आणून दाखविली. मग जयरामस्वामी सर्व मंडळी बरोबर घेऊन कृष्णाप्पास्वामी यांजपाशीं आले आणि परम नम्रतेनें गुरूचा स्तव करून हात जोडून बोलले कीं, आज्ञेप्रमाणें गुहा तयार केली आहे. असें ऐकून श्रीकृष्णाप्पास्वामी नेत्र उघडून जयरामस्वामींकडे अवलोकन करून बोलले कीं जयराम तूं आज फार स्तुति केली त्याचा अभिप्राय सर्व कळला व तुजला ध्यानाचे वेळेस सांगितलें च आहे, तूं कांहीं काळजी न करितां आम्ही सांगितल्याचा बंदोबस्त करणें. मग जयरामस्वामी यांनीं सांगितलें कीं, आम्हीं सर्व तयारी केली आहे. आपले इच्छेस येईल त्याप्रमाणें करावें. मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं जयरामस्वामी यांस विचारिलें कीं, शक कोणता व मास कोणता आहे? व तीथ कोणती, वार कोणता, व नक्षत्र कोणतें आहे? हें मजला सांगावें. मग जयरामस्वामी यांनीं सांगितल कीं, उत्तरायण माघमास, तीथ पौर्णिमा, नक्षत्र आश्लेषा आहे, शक १५८५ आहे. असें सांगून जयरामस्वामी उभे राहिले असतां श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं विचार केला कीं, आजचा दिवस समाधींत बसावयाजोगा आहे. मग श्रीकृष्णाप्पास्वामी जयरामस्वामी यांचा हात धरून श्रीभवानीशंकर यांच्या देवालयापाशीं अश्वत्थाच्या वृक्षासमीप उभे राहिले. तेव्हां जयरामस्वामी यांनीं जी गुहा केलेली होती ती कृष्णाप्पास्वामी यांस दाखविली. मग श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं आपले गुरूचरणांचें तीर्थ त्या गुहेमध्यें टाकून, वरती दर्भासन घालून, वरती कृष्णाजिन व त्यावर कमलासन घालून, त्याजवर वस्त्र घालून, त्यावर आपण पूर्वाभिमुख बसले. पूजेची मूर्ति आपले पुढें सिंहासन मांडून त्याजवर बसवून तिची पूजा करून श्रीज्ञानेश्वरीचा नववा अध्याय वाचून मांडीवर ठेवून गोपीचंदना-

५ हा श्रीज्ञानदेवकृत ग्रंथ शके १२१२ या वर्षी समाप्त झाला. त्यावेळीं देवागिरि (ज्याला मुसलमानी राज्यापासून दवलताबाद म्हणूं लागले) एथें यादव वंशांतील

चा द्वादश तिलक करून मुद्रा धारण करून नखशिखांत भस्मोद्धुलित [आंग] करून गळ्यामध्यें कमलाक्षमाळ व रुद्राक्षमाळ घालून तुळशीचा हार घालून कानामध्यें तुळशीचे मणी बांधून बसते झाले. मग जयरामस्वामींनीं आपली आवडती मंडळी रंगनाथस्वामी, रामदासस्वामी, केशवस्वामी, आनंदमूर्तिस्वामी ह्या चार मंडळींचें स्मरण केल्याबरोबर चारी मंडळी आपापले गांवाहून जयरामस्वामी यांजपाशीं येऊन पोहोंचली आणि विचारलें कीं, कोणते कारणानें मनोवेगानें यावें म्हणून स्मरण केलें तें आम्हांस सांगावें. तेव्हां स्वामींनीं सर्व मजकूर निवेदन केला. मग श्रीजयरामस्वामीसुद्धां पांचांनीं पावनतीर्थ यामध्यें स्नान करून तुळशी फुलें वगैरे नाना प्रकारचे पुष्पांचे हार करून सर्व पूजेचें साहित्य तयार करून श्रीकृष्णाप्पास्वामी यांची पूजा यथासांग करून धूपदीप नैवेद्य दाखवून महानीरांजनकर्पूरदीप लावून श्रीजयरामस्वामी यांनीं आपले हातांत घेऊन आपले गुरूची आरती करते वेळेस [ एक आरती ] केली ( रचिली ) आहे ती अद्याप पर्यंत परंपरेनें म्हणत असतात. अशी आरती करून पुष्पांजलि होऊन स्तुति करून हात जोडून स्वामीसंनिध उभे राहिले. त्या वेळेस स्वर्गाहून देवांनीं पुष्पांची वृष्टि केली. ते वेळेस गांवांतील मंडळी पाहण्यास आली. त्यांनीं आपले दृष्टीनें [ ती पुष्पवृष्टि ] पाहून म्हणूं लागले कीं, हीं पुष्पें कोठून येतात म्हणून वर पाहिलें तों देवांचे विमानांची दाटी पाहून आश्चर्य केलें आणि दुंदुभीचा नाद सर्वत्रांचे कानावर ऐकूं येऊं लागला असें सर्वांनीं पाहिलें. तो समारंभ फार फार आनंदाचा झाला तो

---

रामदेवराव यादव हा राज्य करीत होता. हा देवगिरि एथील यादव वंशाचा सातवा राजा असून शके ११९३ पासून १२३१ पर्यंत गादीवर होता. ज्ञानेश्वर महाराजाचें जन्म शके ११९३ त झालें होतें व ते शके १२१५ त समाधिस्त झाले. यांचें एक चरित्र रा० बळवंत खंडूजी पारख यांनीं इ. स. १८८६ प्रसिद्ध केल आहे व एक इ. स. १८८४ त निनावी छापलें आहे. हीं दोन्हीं चरित्रें वाचकांनीं पहावीं. निनावी चरित्रांत हे शक अनुक्रमें १२०२ व १२१८ असे दिले आहेत.

६. रंगनाथ स्वामी हे नाझरेकर गोपाळपंत आपा देशपांडे यांचे पुत्र यांच्या मातोश्रीचें नांव बयाबाई. यांचे वडील बंधु यादवराव व कनिष्ठ विठ्ठलराव. यादवराव बेदरचे बादशहाजवळ होते. गोपाळपंत यांनीं संन्यास घेतल्यावर त्यांस निजानंद असें म्हणूं लागले. रंगनाथ स्वामी शके १६०६ मार्गशीर्ष वद्य १० स समाधिस्थ झाले.

७. श्रीरामदास स्वामी हे शके १५३० त जन्मले व शके १६०३ त समाधिस्थ झाले. यांच्या चरित्राच्या दोन बखरी छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. एक शके १७९२ त गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत व दुसरी ठाणें एथें सूर्योदय छापखान्यांत इ० स० १८७१ त छापिलेली आहे. त्या दोन्ही वाचकांनीं पहाव्या.

८. केशवस्वामी हे भागानगर ऊर्फ निजाम हैदराबाद एथें रहात असत.

९. आनंदमूर्ति हे वदवती संगमीं श्रीकृष्णातीरीं रहात असत. हे शके १६१८ त समाधिस्थ झाले.

लिहितां येत नाहीं. कोणी संशय घेईल कीं, ही गोष्ट देवलोकाची अधिक लिहिली तर परंपरेनें सांगत आलेली मी लिहिली आहे. मग मंडळी उभी राहिली. श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं सर्वांचे अंतःकरण जाणून बोलले कीं, कोणी कांहीं चिंता न करावी. आपापले परंपरेनें मंत्र गुरूंनीं सांगितला आहे त्या मंत्राचा जप करीत असावें यापेक्षां आमचें मंडळीस कांहीं मागणें नाहीं. असें सर्व मंडळीस सांगून श्रीकृष्णाप्पास्वामीनीं अर्धोन्मीलित नेत्र करून नासिकाग्रीं दृष्टि देऊन समाधिस्थ बसले. तेव्हां आकाशवाणीनें शब्द झाला कीं, आतां गुहेचे तोंडास शिळा लावणें ती शिळा आमचे परवानगीशिवाय कोणी उघडूं नये. कोणी उघडल्यास जळून तो भस्म होईल व त्याचे वंशाचा कुलक्षय होईल. असा शब्द आकाशवाणीनें झाला. मग सर्वत्र नमस्कार करून वरते येऊन गुहेचे तोंडाशीं शिळा लावून वरती समाधि बांधून एक संवत्सरपर्यंत कीर्तन समारंभ करते झाले.

## श्रीजयरास्वामी शके १५४५–१५९४.

श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं शके १५४५ माघ शुद्ध १५ रोजीं समाधि घेतली. त्या वेळेस त्यांची एक शिष्यीण काशीबाई इंदापूरकरीण ही काशीयात्रेस गेली होती. हिनें स्वामींस सांगितलें होतें कीं, मी आल्याखेरीज स्वामींनीं समाधि न घ्यावी अशी माझी इच्छा आहे. नंतर काशीबाई त्रिस्थळी यात्रा करून आपले गांवास आली. नंतर एके दिवशीं रात्रीं तिजला दृष्टांत झाला कीं, स्वामींनीं समाधि घेऊन एक वर्ष झालें आहे. मग ती जागृत होऊन आपले पतीस तो दृष्टांत सांगून आपले पतीस बरोबर घेऊन रात्रीचा दिवस करून वडगांवास आली. तेथें मोठा भजनाचा समारंभ चालला आहे असें पाहून काशीबाई समारंभांत येऊन आपल्या गुरूच्या समाधीकडे पाहून श्रीसद्गुरुनाथ श्रीकृष्णाप्पास्वामी यांचें स्मरण करून फार फार विलाप करिती झाली. तो लिहितां येत नाहीं. मग श्रीजयरामस्वामी व संपूर्ण मंडळी पाहात असतां तिनें प्रतिज्ञा केली कीं, स्वामींनीं समाधि उघडून आपलें दर्शन दिलें तर मी प्राण ठेवीन नाहीं पेक्षां या जाग्यावर मरून जाईन प्राण कांहीं ठेवणार नाहीं. अशी प्रतिज्ञा करून श्रीकृष्णाप्पास्वामींचे समाधीस व सर्वत्र मंडळीस साष्टांग नमस्कार घालून आपले गुरूचे समाधीपुढें सात दिवस पर्यंत बसती झाली. नंतर तिचे शरीरास व्याकुलता येऊन जमिनीवर निचेष्टित पडली. ते दिवशीं रात्रीं जयरामस्वामींचे समाधीमध्यें ध्यान करिते वेळीं रात्रीं श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं जयरामा म्हणून हाक मारिली आणि त्यांस सांगितलें कीं, काशीबाई प्राण देईल यांत कांहीं संशय नाहीं. तुम्ही उदयीक प्रातःकाळीं माझी समाधि उघडून तिजला दर्शन

घेऊं द्यावें. कांहीं एक गोष्टीची शंका न करावी. असें समाधीमध्यें जयरामस्वामी यांस भाषण करून आपण अंतर्धान पावले. मग श्रीजयरामस्वामी यांनीं नेत्र उघडून पाहिलें तों सूर्योदय झाला. तों इतक्यामध्यें श्रीकृष्णाप्पास्वामी यांचा शिष्य कुंदाजी पाटील यानें स्वामी यांस येऊन नमस्कार करून सांगितलें कीं रात्रीं निद्रा केली. मग मजला स्वप्नामध्यें स्वामी यांनीं आज्ञा केली कीं, काशीबाईस समाधि उघडून दर्शन घेऊं द्यावें. असें सांगितलें. इतक्यांत गांवांतील एक ब्राह्मण भगवद्भक्त तेथें आला. जयरामस्वामी व कुंदाजी पाटील हे उभतां एकमेकांपाशीं दृष्टांताचा मजकूर बोलतात तों तो उभयतांस म्हणूं लागला कीं, रात्रीं मजला स्वप्नामध्यें श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं येऊन सांगितलें कीं, माझी समाधि उघडून काशीबाईस दर्शन घेऊं द्यावें. इतकें मजला सांगितल्यावर मी जागृत झालों. हा दृष्टांत कुंदाजी पाटील यांस सांगावा म्हणजे [ सर्व तजवीज होईल असें मला वाटल्यावरून मी ही गोष्ट कळविली आहे तरी ] याचा विचार करून समाधि उघडून काशीबाईस दर्शन घेऊं द्यावें असें मला वाटतें. कांहीं एक संशय न घेतां दर्शन घेऊं द्यावें. मग श्रीजयरामस्वामी यांनीं आपले मनांत विचार केला कीं, मजला, कुंदाजी पाटील यांस, आणि ब्राह्मणास ही दृष्टांत एकच झाला. समाधि उघडून दर्शन घेऊं द्यावें. मग गांवांतील लहान थोर मंडळी यांस जमा करून त्यांस दृष्टांताचा मजकूर सांगून श्रीरंगनाथस्वामी, रामदासस्वामी, आनंदमूर्तिस्वामी व केशवस्वामी यांचें स्मरण केल्याबरोबर [त्यांनीं] येऊन जयरामस्वामी यांस विचारलें कीं, कोणत्या कारणानें आमचें स्मरण केलें. तेव्हां श्रीजयरामस्वामी यांनीं सांगितलें कीं, आम्हांस व गांवांतील मंडळीस दृष्टांत झाला कीं, काशीबाईस समाधि उघडून दर्शन घेऊं द्यावें हें वर्तमान तुम्हास कळवावें आणि तुमच्या व आमच्या विचारानें समाधि उघडून दर्शन घेऊं द्यावें. तर तुमच्या विचारास कसें येतें ! असें चौघांस विचारितां च त्यांनीं सांगितलें कीं, समाधीमध्यें तुम्हांस जी आज्ञा झाली ती करावी असें चौघांनीं सांगतां च स्वामींनीं सर्वत्र मंडळीसुद्धां समाधीपाशीं येऊन पूजेचा समारंभ करून कृष्णनामाचा गजर करीत समाधि उघडली आणि शिळा वरली काढून मग सर्वत्र मंडळींनीं पाहिलें तों गुहेमध्यें श्रीकृष्णाप्पास्वामी हे प्रथमतः समाधिस्थ पूर्वाभिमुख राहिले होते ते उत्तराभिमुख झाले हें सर्वत्र मंडळीनें समक्ष पाहिलें आणि काशीबाईस म्हणूं लागले कीं, श्रीगुरुच्या दर्शनासाठीं प्राण देत होतीस तें दर्शन आतां घ्यावें. अशीं अक्षरें काशीबाईनें ऐकिलीं तेव्हां आनंद युक्त होऊन मूर्च्छेचा त्याग करून स्वामीपाशीं गेली आणि श्रीकृष्णाप्पास्वामींकडे पाहिलें तों गळ्यामध्यें तुळशीचा हार, नाना-



अनुक्रमणिका

प्रकारची पूजा, चोहींकडील लागलेल्या समया, व स्वामीपुढील पंचायतनाच्या संपुष्टाची पूजा जशी कांहीं आतांच केली आहे असें पाहून काशीबाई म्हणूं लागली कीं, स्वामींस समाधि घेऊन आज एक वर्ष झालें परंतु समया लावलेल्या व पूजा केली ती तशीच आहे. असें पाहून साष्टांग नमस्कार घालून श्रीगुरुपुढें उभी राहिली आणि कांहीं बोलावें म्हणून मनांत आणिलें. तों श्रीकृष्णाप्पास्वामी नेत्र उघडून काशीबाईस बोलले कीं, दर्शन झालें! असें बोलून जयरामस्वामी यांस हाक मारून सांगितलें कीं, जशी शिळा पहिली ठेविली होती तशीच ठेवून समाधीचें द्वार बंद करावें. असें कृष्णाप्पास्वामी जयरामस्वामी यांस भाषण करून समाधिस्थ बसले. मग जयरामस्वामी व काशीबाई यांनीं साष्टांग नमस्कार घालून वरती आले आणि शिळा गुहेचे तोंडीं बसवून वरती समाधि बांधिली आणि सर्वत्र मंडळीस आज्ञा केली कीं, आजपासून स्वामींचे आज्ञेखेरीज कोणी समाधि उघडूं नये. या वेळीं स्वामींचे समाधीस एक वर्ष पांच दिवस झाले होते. मोठें कीर्तन करून समारंभ पूर्ण केला आणि सर्वत्र मंडळी यांस निरोप देऊन स्वामींचे सेवेस लागले.

कांहीं एक दिवस जाऊन दुसरे वर्षाची पुण्यतीथ आली ते दिवशीं चाफळाहून रामदासस्वामी यांनीं भेंडाचा रथ पांचखणी करून त्यांत पत्र लिहून पाठविला. तो भेंडाचा रथ आकाशमार्गें स्वामींचे पुढें येऊन उभा राहिला. हें जयरामस्वामी यांनीं पाहिलें. आणि मनांत विचार केला कीं, हा रथ कोठून आला? तों त्या रथांतील कागद दृष्टीस पडला तो वाचिला. त्यांतील मजकूर "स्वस्ति श्रीगुरुभक्तिपरायण जयरामस्वामी यांस प्रीतिपूर्वक रामदासस्वामी यांचा शिरसाष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना तागाईत मिति माघ शुद्ध १५ पावेतों श्रीरामाचे कृपेकरून क्षेम असो विशेष. आपले मंडळीस हल्लीं भेंडाचा रथ करून पाठविला आहे तरी आपले गुरूच्या पुण्यतिथीच्या दुसरे दिवशीं त्या रथांत श्रीकृष्णाप्पास्वामींच्या पादुका घालून रथ मिरवीत जावा बहुत काय लिहिणें हे विनंति." असें पत्र वाचून त्यास उत्तर जयरामस्वामी यांनीं लिहिलें. तो मजकूर "विशेष तुम्हीं पत्र व रथ पाठविला तो येऊन पोहोंचला. आपण लिहिलें कीं, रथोत्साह करावा त्यास आपण आल्याखेरीज रथोत्साहास आरंभ होणार नाहीं. त्यास येण्यास अनमान करूं नये अगत्य अगत्य यावें." असें पत्र लिहिलें आणि आकाशमार्गें वाऱ्यावर बसवून रामदासस्वामींकडे पाठविलें. त्यांनीं तें पत्र वाचून आपण मनोवेगानें

१०. ही भेंडांचा रथ पाठविल्याची गोष्ट श्रीरामदास स्वामींचे बखरीचे ३३ वे पृष्ठांत आहे.

# अनेककविकृत मराठी कविता
## भाग ४ था.

### गजेंद्रमोक्ष.
#### सवाईवृत्त.

श्रीनिजमूर्ति तुझें पदसेवन जीवन देउनि नीवर्वि काया ।
जें भवतारक तापनिवारक लावि गिरा तव नाम वदाया ॥
मानस मीपण टाकुनि निश्चल हो स्वरूपीं रत छेदुनि माया ।
रंग अभंग करीं नलगे मज इंद्रपदादिक ही गुरुराया ॥ १ ॥
पार अपार हरादिक नेणति तो गुरुराज सखा मजला ।
बोलियला मुनिमानसमोहन मागसि तें दिधलें तुजला ॥
बोल सुखावह डोलति सज्जन सांग गजेंद्र कसा तरला ।
तो वर लाहुनियां सरसा मग रंग सुखानुभवीं भरला ॥ २ ॥
एक मनोरम तो गिरि उत्तम ज्या त्रिकुटाचळ नाम विराजे ।
दीर्घ शतेंशत योजन मंडित त्या तुळणा सम मेरु चि साजे ॥
वृक्षलता बहुतां परि डोलति कोकिळशूकमुखारव वाजे ।
खेळति पक्षिकुळें विविधाकृति शार्दुल गर्जति अंबर गाजे ॥ ३ ॥
किन्नरगायननादसुधारस ऐकति सिद्ध मुनींद्र सुखें
योगलिलेप्रति साधक साधिति तें सुख वानिल कोण मुखें ।
एक निवृत्त परात्परशोधक डोलति ऐक्यपणें हरिखें
त्या अनुपम्य पदाप्रति दाविल श्रीगुरुवांचुनि कोण सखें ॥ ४ ॥
आमृततुल्य सरोवरिंचें जल सेवुनियां क्रीडति वनगाई
हेममयीं कमळीं रत षट्पद मज्जनपान अती सुखदायी ।
पादप पुष्पफळांकित उत्तम तेयिल वानिल कोण नवाई
मानुनियां सुख भोज्य विराजतसे गजराज मदोन्मत ठायीं ॥ ५ ॥
भीम पराक्रम काळ तुळे सम दिग्गजनाम भयें दुर जाती
निर्जरनायकवाहन ही भयभीत धरातळिंचे गज कीती ।
मेघमुखाहुनि घोष विशेष भयें क्षिति लंघिति श्वापद जाती
कोण गणी अगणीत बळा गजराज करी समवेत स्वजाती ॥ ६ ॥

अनुक्रमणिका

यापरि हिंडतसे वन धुंडित सेवित कोमल पल्लव चारा
कामवशें विचरे विधि टाकुनि बोधित कोण तया अविचारा ।
क्रोध कदा न शमे अघदायक मोह सदा स्रवती मदधारा
मत्सर दंभ निरंतर गर्व अनावर सर्व अनर्थ पसारा ॥ ७ ॥
एक दिनीं फळ पल्लव सेवुनि व्याकुळ प्राण तृषा सकळांसी
उत्तम तीर निरीक्षुनियां निर देउनि तृप्त करी सहवासी ।
तोय मुखीं जंव घालितसे तंव वोढवलें सळ अद्भुत त्यासी
नक्र जळीं पद ओढित जेंवि दिवाकरबिंब बळें ग्रह ग्रासी ॥ ८ ॥
रोवुनि दांत पदीं पद ओढितसे गज ताडित त्यासि बळें
याप जळावरि मारितसे परि नक्र पराक्रम तो न ढळे ।
गोवियला गजराज निरीक्षुनियां परिवार समूळ पळे
युद्धवशें तनु जर्जर होउनि व्याकुळ तो गज शक्ति गळे ॥ ९ ॥
चिंतितसे गज संकट हें मज बंधु सुता सुत निष्ठुर पाहा
प्रीय कलत्र स्वगोत्रज मित्र तयांप्रति तों उचितार्थ नव्हे हा ।
वैभव तों सुखसंभ्रम दाविति कृत्रिम लाघव लाविति मोहा
व्यर्थ अनर्थकरें प्रतिपाळुनि शेवट येकट येकट हा हा ॥ १० ॥
कामविलास सुखावह मानुनि अर्चितसे मज लागुनि जाया
बंधु वदें धनसंग्रह दे मज याविण तो स्नेह दाविति वाया ।
सूत सभाग्यपणीं अनुकूल उपेक्षिति जे दिनिं जर्जर काया
पामर मी भुललों मृगतृष्णिक भूलविलें ममतामोह माया ॥ ११ ॥
खेद करी अनुताप धरी अवलोकित काय उपाय करावा
आठवला सुखदायक मंत्र दयानिधि तो जगदीश वरावा ।
वारिल संकट तो सुखसागर भावबळें भवसिंधु तरावा
त्याविण आणिक मित्र नसे कळलें गुज हा मज लोक पराचा ॥ १२ ॥
अंबुज एक करें अवलंबुनि भक्तिपुरःसर डोलतसे
हृत्कमळीं कमळापति चिंतुनि मंद गिरा मग बोलतसे ।
हृद्गत तूं निजमूर्ति सखा तुजवीण दुजें मज कोण असे
पाव अपाय निवारुनि मी मज दावुनि वारिं समूळ पिसें ॥ १३ ॥
तूं अज अव्यय नित्य निरामय तूं सदचिन्मय सौख्यविधाना
हा जगडंबर भासत तद्वत ओघ तरंग जळावरि नाना ।
कुंडल किंकिणि नूपुर कंकण कांचन एक बहू अभिधाना
वेद वदे जगदंतर एक निरंतर नातळसी भवभाना ॥ १४ ॥

विश्वरूपा अरूपा अविकार अनाम असंग अनंत अपारा
शास्त्रपुराण विवाद सदा करिती परि निश्चित नेणति पारा ।
विश्व तुझ्या स्वरूपीं परिकल्पिति विद्वत वानिति विश्व अधारा
नेति वदूनि सरे श्रुतिवाद न वाच्य अवाच्य वृथा श्रम सारा ॥ १५ ॥
साच नसे मृगतोय सुनिश्चित आश्रय भानु तयाप्रति पाहे
लोह चळे परि चुंबक अक्रिय निष्क्रिय तेंवि विलासत आहे ।
दृश्य नसे घन चिद्रुप तद्रुप तंतुपटत्वरूपें दिसताहे
हें निज गुह्य अलौकिक जाणति संत अनंत सुखें रमताहे ॥ १६ ॥
निर्गुण जें रूप या परिचें विणभेद सगुण हि त्या वदती
तें सुखदायक मानुनि एक विराग धरूनि मनें भजती ।
भक्तिसुखें तुज अर्चिति उत्तम ते परिमीतिरहीत किती
त्या करुणा वरि श्रीचरणाप्रति मी शरणागत आर्तमती ॥ १७ ॥
उद्धरिला अजमीळ अहंकृति तारियली गणिका अघराशी
हिंसक व्याध जिवांप्रति मारुनियां शर भक्षित त्यांसी ।
चोज कसें गुज सांग तयाहुनि पातक काय असे मजपाशीं
दीनदयाकर हे बिरुदावळि वानिति वेद निरंतर कैशी ॥ १८ ॥
पीडितसे ग्रह वारुनि यासि अनुग्रह दे मज नित्य सुखा
कीर्ति करीं निज भूषण तारुनि दुष्कृतराशि पशू विमुखा ।
मी तृणभक्षक मंदमती महिमान अगोचर शेषमुखा
जाणसि अंतरिंचे अति संकट आन नसे तुजवीण सखा ॥ १९ ॥
अंतरिंचा अनुताप विलोकुनि तो करुणाघन येउनि नेटें
नक्र जळीं जंव ओढितसे तंव हाणितले निज चक्रचपेटे ।
फोडुनियां मुख काढित बाहिर नक्रगजा अति अद्भुत मोठें
पद्मकरें अभयंकर देउनि सोडविलें पशुदेह सुनाटें ॥ २० ॥
अमृत हस्तक ठेवुनियां कुरवाळित मस्तक तो सुखदानी
वाजति मंगळ घोष सुकीर्ति सुभाषित बोलति देव विमानीं ।
भक्तिसुखाहुनि थोर नसे सुखकारक वेद वदे गुज कानीं
मायिक तें लटकीं अघदायक जानकिनायक एक निदानीं ॥ २१ ॥
भक्तिसुखें प्रह्लाद तरे मुनि नारद भक्तिसुखें चि तरे
भक्तिसुखें सनकादिक पावन भक्तिसुखें उपमन्यु तरे ।
भक्तिसुखें ध्रुवबाळ सुखावह व्यासमुखें जगताप हरे
वाल्मिकि अंबरिषी बळि भीष्म शुकादिक तन्मय भक्तिभरें ॥ २२ ॥

उद्धव अर्जुन धर्म बिभीषण रामपदीं रत चित्त जयांचें
अक्रुर वैष्णव भक्त कपी हनुमंत सभाग्य जिणें बिदुराचें ।
भानुकुळीं रुक्मांगद भक्त सुधाकरवंशिं परीक्षिति साचें
ऐक्य निरंतर चित्स्वरूपीं निज भक्ति वदे श्रुति नाम तयाचें ॥ २३ ॥
भक्त सुपावन नित्य सुखी मन उन्मन होउनि भेदविना तें
भोगिति भोग अतींद्रिय देखति एकपणें चि जना विजनातें ।
सारुनि मीपण भाविति आपण अद्वय अक्रिय ज्ञानघनातें
रंग विना निज वस्तु सदोदित प्रत्यय निश्चित साधु जनातें ॥ २४ ॥

समाप्त.

---

वामनपंडितकृत

## वामनचरित्र.

### घनाक्षरी वृत्त.

करीं कमंडलू दंड दावी कौतुकें ऊदंड ।
ध्यावा हृदयीं अखंड भवगजकेसरी ॥ १ ॥
सुखी सर्वांचें ही मन करी कमळनयन ।
सहस्राननशयन दावी शब्द कूसरी ॥ २ ॥
इंद्रासी दे इंद्रपद बळीमस्तकीं स्वपद ।
गंगा आणूनी त्रिपद जगीं पुण्य पसरी ॥ ३ ॥
पायीं पावन जीवन कथा जीवाचें जीवन ।
ऐशा वामनीं वामन नेणे बुद्धि दूसरी ॥ ४ ॥ १ ॥
अहो बळी भाग्यवंत ज्याच्या दारीं भगवंत ।
देतां जग अंतवंत अनंतत्व पावला ॥ १ ॥
देऊनि ही तिन्ही लोक अणुमात्र नेणे शोक ।
मस्तकें ही पुण्यश्लोक चरणींचें पावला ॥ २ ॥
सर्व अर्पूनि ही धीर तिजा पावलासी शिर ।
देतां न लावी उशीर आनंद दुणावला ॥ ३ ॥
शाप देतां शुक्र खळ तरी नव्हे चि विकळ ।
दान करूनी सकळ म्हणे डाव फावला ॥ ४ ॥ २ ॥
इंद्राहूनि ही कल्याण करी बळीचें सुजाण ।
तया देवाची च आण नव्हे गोष्टी लटकी ॥ १ ॥
केला इंद्र भाग्यवंत देउनी ज्या अंतवंत ।

संपदा त्या भगवंत करी ज्याच्या बटकी ॥ २ ॥
इंद्र इंद्रपददास बळी त्यावरी उदास ।
दासीसम ज्या पदास लेखीना निपट कीं ॥ ३ ॥
म्हणूनि च विश्वपाळ झाला द्वारीं द्वारपाळ ।
जयापाशीं सर्वकाळ असुरांच्या कटकी ॥ ४ ॥ ३ ॥
बळी हा चि सत्वगुण यास करा हो निपुण ।
भाग्या अपत्याची खुण कळतां ठसा पडे ॥ १ ॥
तंतूलागीं सर्व पट देतां काय खटपट ।
तैसें अर्पितां निपट विश्व हें न सांपडे ॥ २ ॥
ऐसें दान दे जें सत्व नुरे त्यास हीं भिन्नत्व ।
आत्म--निवेदन--तत्व नेणती हे बापडे ॥ ३ ॥
व्यर्थ घेऊनी संन्यास वेष दावीती अन्यास ।
होतां वामनीं हा न्यास कर्मशेंडी ऊपडे ॥ ४ ॥ ४ ॥

समाप्त.

---

## स्फुट श्लोक-पृथ्वीछंद.

असेल जरि पूजिला विपुल हस्तकें श्रीहरी
नसेल जरि योजिला विषम भाव सर्वांतरीं ।
करूनि विहितें बरीं समुळ अर्पिलीं ईश्वरीं
तरी च गुरु केसरी भवगजासि नाहीं करी ॥ १ ॥
महेश महदादिकीं वसति एक भेदें विना ।
अशीच जरि भावना सतत वर्तली या मना
दया सकळ भूति कीं वसति जन्मजनांतरीं
तरी च गुरु केसरी भवगजासि नाहीं करी ॥ २ ॥
जगासि जनका न कां विमळ लक्षणीं लक्षिलें ।
सकांक्षवत सत्क्रिये परम आदरें लक्षिलें ।
निशापति दशावशें विगतसंशयो अंतरीं
तरी च गुरु केसरी भवगजासि नाहीं करी ॥ ३ ॥
अनाथ पद वागवी स्मरण सर्वदा जागवी
विषाद मद मोह तो समुळ चित्तिचा त्यागवी ॥
सदा विदुषसंगती निजहिताप्रती जें धरी ।
तरी च गुरु केसरी भवगजासि नाहीं करी ॥ ४ ॥

अनंदगिरिशीखरीं मनमयूर नाचे सदा
दिवानिशि हि नाठवे सकळ संपदा आपदा।
निजानुभव रंगला विशद बोध अर्कापरी
तरी च गुरु केसरी भवगजासि नाहीं करी ॥ ९ ॥

समाप्त.

---

## नरहरिकृत गंगारत्नमाला.

### वृत्त शार्दूलविक्रीडित.

गौरीहारमणी अमर्त्यरमणी नक्षत्रतारामणी
विद्यारत्नखनी अघाद्रिनिसणी लोकत्रयाचा धणी ॥
बैसायासि फणी हृदब्जतरणी जो भक्तचिंतामणी
राहो तच्चरणीं प्रणामसरणी माझी जगत्कारणीं ॥ १ ॥

### वृत्त वसंततिलका.

भागीरथि त्रिपथगे पदवंदनातें । मी दीन गे करितसें मतिमंद मातें ॥
हेतू मनांत भरला तव गुण गाया । जावो न मागत असें इतुकें चि वाया २

### वृत्त शार्दूलविक्रीडित.

विश्वामित्र निजाश्रमीं मख करी पाहोनि रात्रिचरीं
केला त्रास विशेष सोडुनि बळें रक्तास्थिवृष्टी वरी ॥
व्हाया राक्षसनाश क्षत्रियकरें आणावया राघवा
साकेतानगरीस गाधिज मुनी आला स्वयें तेधवां ॥ ३ ॥

### वृत्त मालिनी.

दशरथ मुनि येतां दे तया आसनाला । करुनि सकल पूजा ठेवि पादाब्जिं भाला ॥
नमुनि करि विनंती काय इच्छा मनाची। कळविसि जरि दासा पूर्ण होईल साची ४
मुनिवर मग बोले राजया ज्ञानराशी । निज सुत मज द्यावा यज्ञ रक्षावयासी ॥
परिसुनि वचनाला भूपती खेद पावे । निजगुरुप्रति बोले सांग कैसें करावें ॥५॥

### वृत्त उपेंद्रवज्रा.

लहान हा राम वसिष्ठराया । न होय माझें मन यासि द्याया ॥
कसें गुरूच्या मरजीस येतें । वदाल जें सत्य करीन मी तें ॥ ६ ॥

### वृत्त उपजाति.

गुरू म्हणे वंदिति देव याला । न पाहतां सानुज दे वयाला ॥
वसिष्ठवाक्यें सह लक्ष्मणाला । देवोनि रामा सुखवी मुनीला ॥ ७ ॥

## वृत्त मालिनी.

कुशिकतनय रामा घेउनी सानुजाला । अतिमुदित निघाला यावया आश्रमाला ॥
कथन करित गोष्टी रामरायासि चाले । तंव रवि दिनमध्यें पातला ऊन झालें ॥ ८॥

## वृत्त उपजाति.

वसंतकालीन मुळीं उन्हाळा । असोनि मध्यान्ह तयांत झाला ॥
अत्यंत तापे परितप्त तो कीं । कुमार श्रीराम दिशा विलोकी ॥ ९ ॥
स्वेदोदकें सर्व शरीर न्हालें । उष्णें तसे गाल हि लाल झाले ॥
मार्गश्रमें तापविले मनाला । पाही तदा सानुज काननाला ॥ १० ॥

## वृत्त शार्दूलविक्रीडित.

ओढे वोस कितेक मार्गि दिसती भूमी तशी तापली ।
अंगा लागति उष्ण वातलहरी छाया पदीं आपली ॥
पांथ श्रांत पथिं श्रमें तरुतळीं विश्रांतिला पाहती ।
तापें तप्त समस्त पक्षिगण ते वृक्षांतरीं राहती ॥ ११ ॥
सूर्याचे किरणीं जलभ्रम मृगा होतां त्वरें धांवती ।
तेथें शून्य विलोकितां तृषित ते व्यर्थ श्रमा पावती ॥
झाले लाल पलाश वृक्ष दिसती निष्पर्ण जे फूलले ।
भृंगे सोडुनि पद्म येति जवळी तद्रक्त ते भूलले ॥ १२ ॥

## वृत्त उपजाति.

कोठें तरू पल्लवयुक्त मोठे । तळीं तयांच्या मृगवृंद लोटे ॥
छाया जयांची वरि दाट भारी । योरापरी संश्रित ताप वारी ॥ १३ ॥

## वृत्त शार्दूलविक्रीडित.

कोठें गांव तयांत शूद्र वसती सन्नीध त्यांच्या मळे ।
मोटांचा रव कानिं अद्भुत पडे शृंगी वहाती बळें ॥
तेथें मोहरले रसाळ फिरती भृंगे तयां भोंवते ।
पांथांतें सुख देति चालति बरीं जीं कोकिलांचीं रुतें ॥ १४ ॥

## वृत्त मालिनी.

अतिशय रवितापे ताप होतां चि रानीं । त्यजुनि गवत खाणें दीधलें तें गुरांनीं ॥
सकळ मिळति छाया पाहुनी एक ठायीं । रंवथ करित कोठें बैसल्या थंड गायी ॥१५॥

## दिंडी.

पुढें जातां पाहोनि जान्हवीला । रामचित्तीं संतोष फार झाला ॥
वंदुनीयां गाधीजमुनीपायां । म्हणे सांगा ही कोण मुनीराया ॥ १६ ॥
नांव काय ही उत्पन्न कोण ठायीं । पाहतां ची संतोष दे मला हीं ॥

दाट झाडी अत्युच्च दों तटा या । स्वयें तापा साहोनि करी छाया ॥ १७॥
आम्र जंबू जंबीर ताल जाती । नभा स्पर्शाया काय ऊर्ध्व जाती ॥
वरी चाष हि कोकील मत्त रावे । पांथ जातां बोलावितात्ति यावें ॥ १८ ॥

**वृत्त भुजंगप्रयात.**

पहा या नदीचे तटीं पर्णशाळा । मनोरम्य ज्या दीसताती विशाळा ॥
सती या ठिकाणीं पती पूजिताती । द्विजन्में किती सामवेदासि गाती ॥१९॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

आहा जी मुनिराय धन्य जहलों पाहोनियां आश्रमा ।
माझें चित्त सुखावलें पुनरपी हें आठवी न श्रमा ॥
चाले निर्मळ वेदघोष मजला ऐकावया येतसे ।
स्वाध्यायाभ्यसनीं द्विजौघ अवघा हा मग्न झाला असे ॥ २० ॥
एथें आश्रमसन्निधी च तटिनी स्वच्छोदका वाहती ।
वैरा श्वापद टाकुनी हि सहजा शत्रूसवें खेळती ॥
हत्तीपोटिशिं वांसरूं दडतसे आखू न ओंतूस भी ।
व्याघ्रांगावरि मान ठेवुनि पहा ही गाय आहे उभी ॥ २१ ॥

**वृत्त उपजाति.**

निर्वैर या पाहुनि आश्रमातें । भारी च होतें सुख आजि मातें ॥
प्रेमें वृकांनीं मृग खाजवावे । जेथें अशा टाकुनि काय जावें ॥ २२ ॥

**साकी.**

मध्यान्हीं रवि आला पाहुनि, नदीजलाचे कांठीं ॥
दर्भ करीं निज कर्म कराया, झाली मुनिंची दाटी ॥ २३ ॥
शिशू किती उपनीत ऋषींचे, आले गंगातीरीं ॥
दंड कमंडलु दर्भ मुष्टिकरीं, कृष्णाजीन शरीरीं ॥ २४ ॥
जटामुकुट शिरिं कटिस मेखला, भस्म विलेपन तनुसी ॥
ब्रह्मसूत्रयुत वामनमूर्ती, सुखविति पहतां मजसी ॥ २५ ॥
पहा पहा हे पोहुं लागले, उदकीं जाउनि कैसे ॥
देह जलांतरिं मान दिसे वरि, भासति कच्छप जैसे ॥ २६ ॥
जनक मारिती हका परंतु, परतीराला जाती ॥
अहंपुर्विके करुनि पुन्हा ते, परतुनि सत्वर येती ॥ २७ ॥
लाटा येतां त्यांवरि मारुनि, करयुग शब्दा करीती ॥
पुढें पोहतां गुप्त जाउनी, मागुनि त्यांतें धरीती ॥ २८ ॥
बुडे एक त्या हुडकी दुसरा, तंव तो वरती आला ॥

## THE KÂVYETIHÂSA-SANGRAHA.

THE object of the *Kâvyetihâsa-Sangraha*, a monthly Magazine edited with notes critical and explanatory by Messrs J. B. Modak B. A. and K. N. Sâne B. A. is to publish in extenso (*First*) the old Marâthâ chronicles (Bakhars) and other documents bearing on the History of the Marâthâ chiefs and other princes of the Deccan, and (*Secondly*) all the Marathi poems that were not published in the late *Sarva-Sangraha* and each number consists of 48 pages, Rooyal 8vo which are distributed among the two branches. As to the utility and importance of such a work and the manner in which it has been conducted we beg to refer the public to the favourable opinions of some of the best Scholars of this presidency published from time to time on the fly-leaves of this Mgazine. It is priced at Rs. 1 As. 6 per annum (advance rate) including postage. All communications to be addressed to 'The *Manager*, *Kâvyetihâsa Sangraha, Thana.*

## काव्येतिहास-संग्रह.

हें उपयुक्त पुस्तक दर महिन्यास निघत असतें. यांत जुन्या बखरी व दुसरे इतिहाससंबंधीं कागद पत्र, माजी सर्व संग्रहांत प्रसिद्ध न झालेलीं जुनीं मराठी काव्यें, यांचा संग्रह होत असतो. प्रत्येक प्रकरणावर कठीण स्थलीं टीपा, अवांतर माहिती, व निरनिराळ्या प्रतींचे पाठ दिलेले असतात. या पुस्तकाचीं रायल सांच्याचीं ४८ पृष्ठें असून ४०,८ अशीं पृष्ठें प्रत्येक विषयाकडे दिलेलीं असतात. हे जीर्ण ग्रंथांचा उद्धार करण्याचें काम किती उपयोगाचें व महत्वाचें आहे व तें कोणत्या रीतीनें चालविलें जात आहे अशा बद्दल पुष्कळ विद्वान् मंडळीचे अभिप्राय वेळोवेळीं प्रसिद्ध झाले आहेत.

हें पुस्तक सर्वांस घेण्यास सुलभ पडावें म्हणून याची किंमत येणेंप्रमाणे ठेविली आहे. ऐन किंमत. रु० आ०.

वर्षास आगाऊ.................................१ रुपये ६

" मागाहून.................................५ रुपये ८

आगाऊची मुदत पुस्तक घेऊं लागल्यापासून दोन महिन्यांचे आंत समजावी.

या पुस्तकासंबंधें हरएक प्रकारचा पत्रव्यवहार ठेवणें तो:- काव्येतिहास-संग्रह व्यवस्थापक, ठाणें या पत्त्यावर ठेवावा.



अनुक्रमणिका